


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १३ वें ]　　जुलै १९६०　　[ अंक १०



— वाचकांचा -- पत्रव्यवहार —

वार्षिक वर्गणी ९ रु. ]　　[ किरकोळ अंक १ रु.






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष तेरावें
अंक दहावा

जुलै
१९६०

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत-श्री. हरि कृष्ण मोहनी-प्रा. वि. म. बेडेकर
प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९
२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( ज. सातारा )

प्राज्ञपाठशाला-मण्डळ-ग्रंथमाला

# धर्मकोश

# संस्कारकाण्ड

भाग १ ला

सुपररॉयल साइज, पृष्ठसंख्या ९००, किंमत ४५ रु.

संस्कारकाण्डाचा प्रथम भाग प्रकाशित झाला आहे. या भागांत संस्कारांसंबंधीं सामान्य विचार, गोत्र, प्रवर व सापिण्डय यांसंबंधीं विस्तृत शास्त्रार्थ, विवाहकाल, विवाहाचे प्रकार इत्यादि विषय आलेले आहेत. धर्मशास्त्राचें आधुनिक पद्धतीनें संशोधन करणाऱ्या संशोधकांस व प्राचीन पण्डित-याज्ञिक यांसही हा भाग अत्यंत उपयुक्त असल्यामुळें संग्राह्य आहे.

मिळण्याचें ठिकाण -- प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

[ जि० उत्तर सातारा ]

# सार–संकलन

## मैत्री कीं प्रचार ? नवें सोविएट विद्यापीठ :

"दि. २१ फेब्रुवारी १९६० रोजीं इंडोनेशियांतील गडजामाडा विद्यापीठांतील भाषणांत आशिया, आफ्रिका व लॅटिन अमेरिका खंडांत नवें राष्ट्रीय नेतृत्व तयार करण्याच्या कार्यास हातभार लावण्यास सोविएट युनियन उत्सुक असून या प्रदेशांतील जनतेची मैत्री संपादन करण्याच्या हेतूनें मॉस्कोंत एक नवें विद्यापीठ काढण्याचा निर्णय घेतला गेल्याची क्रुश्चेव्हनें घोषणा केली. दुसऱ्या दिवशीं 'प्रवदा' पत्रानें हें विद्यापीठ स्थापन झाल्याचें जाहीर केलें व अवघ्या तीनच दिवसांत त्यावर एक लेखहि प्रसिद्ध केला." या योजनेचें विश्लेषण करणारा एक लेख म्युनिकच्या "इंस्टिट्यूट फॉर दि स्टडी ऑफ् यु. एस्. एस्. आर" च्या "बुलेटिन" च्या एप्रिल १९६० च्या अंकांत श्री. स्टॅकेलबर्ग यांनीं लिहिला आहे. त्याचा थोडक्यांत सारांश येथें देत आहोंत :

हें विद्यापीठ प्रचारपीठ असणार यांत शंका नाहीं. आशिया-आफ्रिकेसाठीं तंत्रज्ञ व नेते तयार करण्याची ही कम्युनिस्ट पद्धत नवी नाहीं. जगांतील श्रमजीवी जनतेसाठीं मॉस्कोमध्यें १९२१ सालीं काढण्यांत आलेलें विद्यापीठ वा चीनमधील सुन्यत्सेन विद्यापीठ हीं चटकन् डोळ्यासमोर येतात. फरक इतकाच कीं या नव्या विद्यापीठांत कितीतरी अधिक विद्यार्थी असतील व त्यांचें शिक्षणहि व्यापक स्वरूपाचें, नव्या पद्धतीचें, व तंत्रविद्येचादेखील प्रचारात्मक उपयोग करणाऱ्या नव्या पद्धतीचें असेल. शिवाय, जुन्या विद्यापीठाचें कार्य कम्युनिस्ट क्रांतिकारक निर्माण करणें हें होतें. आज आशिया-आफ्रिका खंडांतील कित्येक राष्ट्रें स्वतंत्र झालीं असल्यानें सोविएटला तेथें कम्युनिझमूला अनुकूल बुद्धिवादी वर्ग व प्रचारक निर्माण करणें आवश्यक झालें आहे. नव्या विद्यापीठाचें हें कार्य आहे. मात्र या वेळीं आशिया आफ्रिकेबरोबरच लॅटिन अमेरिकेचाहि समावेश करण्यांत आला आहे. हेतु हा कीं पाश्चात्य वसाहतवादाचा अनुभव घेतलेले व अमेरिकेच्या पिळवणुकीसंबंधीं तक्रार करणारे प्रदेश एकत्र यावेत व पाश्चात्य राष्ट्रें व विशेषतः अमेरिका यांजविरुद्ध एकजूट उभी करणें सुलभ व्हावें. या विद्यापीठाचें कार्य केवळ तंत्रविद्येपुरतें मर्यादित नाहीं. स्थापत्य, शेती, वैद्यक, पदार्थविज्ञान व गणित, भौतिक विज्ञान, इतिहास व तत्त्वज्ञान, अर्थशास्त्र व आंतरराष्ट्रीय कायदा इत्यादि विविध ज्ञानशाखांतील शिक्षणाची तरतूद तेथें करण्यांत येणार आहे. सामाजिक व सांस्कृतिक क्षेत्रांतील निरनिराळ्या प्रकारचे कार्यकर्ते सोविएट विचारसरणीच्या वर्चस्वाखालीं येथें आणले जातील हें उघड आहे. तत्त्वज्ञान काय वा इतिहास काय, मार्क्सवाद–लेनिनवाद हीच त्यांची मूळ बैठक असणार हें उघड आहे.

कम्युनिझमच्या प्रसाराची दूरवर दृष्टि ठेवून या विद्यापीठाची स्थापना होत आहे ही गोष्ट छपवण्याचा प्रयत्न सोविएट नेत्यांनीं केला आहे. इंडोनेशियांतील भाषणांत "सोविएट सरकारनें हें विद्यापीठ काढण्याचा निर्णय घेतल्याचें" क्रुश्चेव्हनें जाहीर केलें. नंतर प्रवदांतील लेखांत सोविएट मंत्रिमंडळाबरोबरच "सोविएट कमिटी फॉर् दि सॉलिडॅरिटी ऑफ् आफ्रो–एशियन कंट्रीज", युनियन ऑफ् सोविएट सोसायटीज् फॉर फ्रेंड्शिप् अँड कल्चरल् टाइज् वुइथ फॉरेन् कंट्रीज व ऑल युनियन् सेंट्रल कौंसिल् ऑफ् ट्रेड युनियन्स्" या "खाजगी" संस्थाहि तें काढण्यास जबाबदार आहेत असें घोषित करण्यांत आलें; व विद्यापीठाचे रेक्टर व कौन्सिलचे सभासद यांच्या नेमणुका व प्रवेशाबाबतचे नियम इत्यादि गोष्टी या संघटनांनीच ठरवल्या आहेत असें जाहीर झालें. अभ्यासक्रमाचें शिक्षण, वास्तव्य व सांस्कृतिक कार्य यासाठीं आवश्यक सवलती काय त्या सोविएट सरकारनें पुरवायच्या; या पलीकडे त्यांचा विद्यापीठाशीं कसलाहि संबंध नाहीं अशी औपचारिक सुटका करून घेण्यांत आली. विद्यापीठाची








संघटना, प्रवेशाबाबतचे नियम इत्यादि बाबतींत कम्युनिस्ट पक्षाचा कोठें नामनिर्देशहि आढळत नाहीं. विद्यापीठ बिनसरकारी वा खाजगी राहील हें भासविण्याचा आणखी एक प्रयत्न म्हणजे विद्यापीठांत प्रवेश देण्याबाबतचे निर्णय घेण्याची कचेरी सरकारी शिक्षणखात्याच्या इमारतींत न ठेवतां " सेंटर फॉर फ्रेंड्शिप् वुइथ दि पीपल्स् ऑफ् फॉरेन् कंट्रीज " या संघटनेच्या कार्यालयांत ठेवण्यांत आली आहे.

विद्यापीठांत दाखल होऊं इच्छिणारांनीं आपापल्या राष्ट्रांतील सार्वजनिकसंस्था, सरकार, सोविएट वकिलात इत्यादींच्या द्वारा किंवा स्वतंत्रपणें अर्ज करावेत अशी घोषणा प्रथम करण्यांत आली. तथापि " सोविएट युनियनमध्यें अध्ययनासाठीं येणारे परकीय विद्यार्थी तेथील सरकारी यंत्रणेद्वारा निवडले जातात व म्हणून असें अध्ययन करण्याची आपली इच्छा अनेक गरीब मुलांना पुरी करतां येत नाहीं." असें क्रुश्चेव्हनें उद्गार काढले व नंतर वरील प्रवेशपद्धतींतील " सार्वजनिक संस्था वा सरकार " हा संदर्भ गाळण्यांत आला. " सोविएट कमिटी फॉर् दि सॉलिडॅरिटी ऑफ् आफ्रो-एशियन कंट्रीज"चे चिटणीस ए. सोफ्रोनॉव्ह यांनीं तर " भांडवलशाही राष्ट्रांतील उच्च शिक्षणसंस्थांत ज्यांना प्रवेश मिळूं शकत नाहीं अशांनाच येथें प्रवेश दिला जाईल " अशी स्पष्ट घोषणाच केली आहे. या विद्यापीठामुळें सामान्य सोविएट विद्यार्थ्यांपासून आफ्रिकन् वा आशियाई विद्यार्थी अलग ठेवले जातील हें अनुचित होय अशी टीका अनेक पाश्चात्य पत्रांनीं केली आहे. तथापि तिकडे संपूर्ण दुर्लक्ष करण्यांत आलें आहे. कारण सोविएटमधील परिस्थिती परकीय विद्यार्थ्यांला योग्यरीतीनें कळणें हा मुळीं विद्यापीठाचा हेतूच नव्हे.

विद्यापीठाचें माध्यम रशियन् राहील. येथें अनेकांना पांचसात वर्षेपर्यंत रशियन भाषेचें शिक्षण देण्याची व्यवस्था होणार आहे. त्यामुळें ते पुढें आपापल्या राष्ट्रांतून शालेय शिक्षणक्रमांत रशियन शिकवूं शकतील. रशियन प्रचार वाङ्मयाच्या अनुवादाचें कार्यहि त्यायोगानें सुलभ होईल. आफ्रिकन् विद्यार्थ्यांनीं या सवलतीचा फायदा घ्यावा यावर विशेष भर दिला जात आहे; व तसें करतांना अनेक आफ्रिकन् राष्ट्रांत सतत वाढत असलेल्या उच्च शिक्षणाच्या सवलतींकडे पूर्ण दुर्लक्ष केलें जात आहे.

आपापल्या देशांतील विकासकार्यांत निष्ठेनें मग्न होणारे कार्यकर्ते निर्माण करण्याचा विद्यापीठाचा हेतु आहे असें क्रुश्चेव्हचें म्हणणें आहे. तथापि हा हेतु त्या त्या राष्ट्रांतील विद्यापीठांतील शिक्षणदर्जा सुधारण्यासाठीं सांहाय्य केल्यानें देखील साध्य होऊं शकतो. उलट, तेथील अनेक तरुणांना मास्कोंत एका विशिष्ट विद्यापीठांत आणून शिकवणें हा प्रचाराचाच मार्ग होय. अशा प्रकारच्या विद्यापीठांचा भूतकाळांतील इतिहास हाहि या मताचें सर्वस्वीं समर्थन करणारा असाच आहे. " कम्युनिस्ट युनिव्हर्सिटी ऑफ् दि टॉयलर्स आफ् दि ईस्ट " चें उदाहरण प्रसिद्ध आहे. तथापि या विद्यापीठाच्या संघटनेंत आणखीहि एक राजकीय हेतु असावासें वाटतें. आफ्रिकेंतील लोकमत अनुकूल करून घेण्याचा माओत्सेतुंगचाहि प्रयत्न आहे. गिनीमध्यें सोविएट व झेकोस्लोवाक तज्ञांबरोबरच सुमारें ४०० चिनी तज्ञहि तेथील शेतकऱ्यांना भातशेतीचें तंत्र शिकवीत आहेत. मागासलेल्या राष्ट्रांत सोविएट ऐवजीं चिनी पद्धतीची राज्यक्रांति अधिक योग्य व इष्ट होय असा माओचा दावा आहे. व हें विद्यापीठ म्हणजे त्याला शह देण्याचा एक प्रयत्न असणेंहि शक्य आहे.

ताशकेंतचें विद्यापीठ सुरूं होऊन चाळीस वर्षें झालीं. या कालावधींत सोविएट नेत्यांचा हेतु जरी तोच कायम असला तरी त्यांचे मार्ग बदलणें स्वाभाविक आहे. त्यावेळीं सोविएटचा सर्व भर राजकीय क्रांतीवर होता; व तिच्यांतून आर्थिक व सांस्कृतिक क्रांति उद्भवेल अशी अपेक्षा होती. आतां हा दृष्टिकोण बदलला असून प्रथम आर्थिक व सांस्कृतिक क्षेत्रांत हल्ला चढवला पाहिजे याची जाणीव सोविएट नेत्यांना झाली आहे. तथापि पौर्वात्य राष्ट्रांत कम्युनिस्ट क्रांति पसरविण्याची तीव्र इच्छा त्यांच्यांत अजूनहि कायम आहे. व हें नवें विद्यापीठ त्या इच्छेंतूनच जन्मास आलें आहे.

## संरक्षक करार आणि सुरक्षिततेचा प्रश्न

भारतीय परराष्ट्रीय धोरणाच्या अनुषंगानें संरक्षक कराराच्या कल्पनेवर अनेक वेळां टीका करण्यांत आली आहे. जागतिक राजकारणांतील दोन्ही प्रबळ राष्ट्रांनीं अशा प्रकारचे करार केले आहेत, व त्यांना उत्तेजन दिलें आहे. या करारांतील भूमिकेचें विश्लेषण करणारा,







## सार-संकलन

शिकागो येथील इलिनॉय विद्यापीठाचे इतिहासाचे प्राध्यापक नार्मन् ग्रॅब्नर यांचा, एक मार्मिक लेख "करंट हिस्ट्री" च्या एप्रिल १९६० च्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे त्याचा थोडक्यांत सारांश येथें देत आहोंत :

सत्ताधिष्ठित राजकारणपद्धतीचा संरक्षक करार हा एक सामान्य आविष्कार आहे. त्यांच्या योगानें सामुदायिक सुरक्षितता साध्य करण्यासाठीं आपापल्या राजकीय बोलणीं वा लष्करी हालचाली करण्याच्या स्वातंत्र्यास मुरड घालण्याची तयारी राष्ट्रें दर्शवीत असतात. करारांमुळें विशिष्ट जबाबदारी येते. निर्णयस्वातंत्र्यास मुरड घालतांना त्यापासून विशेष लाभ होणार आहे अशी खात्री पटल्यावांचून कोणतेंहि राष्ट्र करारांत सामील होण्याची तयारी दाखवीत नाहीं. यामुळें जेव्हां राष्ट्राराष्ट्रांच्या संबंधांत लवचिकपणा असतो व सामान्य शत्रूची कल्पना स्पष्ट असत नाहीं, तेव्हां हे करार फारसे होत नाहींत. आजवर शांततेच्या काळांत शत्रुमित्र या कल्पना स्पष्ट नसत व त्यामुळें असे करार आढळत नव्हते. ते निर्माण होण्यास हितविरोध खोलवर रुजलेला, व्यापक व सहजासहजीं न मिटणारा असावा लागतो. यामुळें संरक्षक करार एका अर्थी आधींच अस्तित्वांत असलेल्या हितैक्याला औपचारिक व स्पष्ट स्वरूप देतो असें म्हणतां येईल. सर्वांनीं मिळून करावयाची कृति व त्यासाठीं प्रसंगीं प्रत्येकानें द्यावयाचें लष्करी साहाय्य हीं त्याच्या योगानें स्पष्ट होतात.

तटस्थ रहाण्याचें स्वातंत्र्य गमावलेलें राष्ट्र पूर्णतया स्वतंत्र आहे असें मानतां येत नाहीं. उदाहरणार्थ, प्रत्यक्ष लष्करी खर्चाइतकाच करारांतून उद्भवणाऱ्या जबाबदाऱ्या पार पाडण्यासाठीं अमेरिकेला खर्च करावा लागतो. अमेरिकेंतील लोकमतहि परंपरागत दृष्टीनें गुतागुंतीचे संबंध निर्माण करणाऱ्या कराराविरुद्धच आहे. व त्याचें कारण भौगोलिक अंतरामुळें इतरांच्या भानगडींत पडायचें कीं नाहीं याविषयीं निर्णय घेण्याचें पूर्ण स्वातंत्र्य आपणास आहे अशी अमेरिकेची खात्री होती. युरोपच्या राजकारणांत समतोलपणा असल्यानें १९ व्या शतकांत ती टिकून राहिली. तथापि कोणतेंहि युद्ध युरोपबाहेर अटलांटिक महासागरापर्यंत पोहोंचलें कीं त्यापासून दूर रहाणें शक्य नाहीं असें आतां अनुभवानें सिद्ध झालें आहे; व आपणांस अलग रीतीनें बाजूस राहतां येईल हा अमेरिकेचा भ्रम आतां नाहींसा झाला आहे.

युद्धजन्य परिस्थितींत झालेले फायदे कायम टिकवूं पहाणाऱ्या वा नवे प्रदेश आपल्या वर्चस्वाखालीं आणूं पहाणाऱ्या सोविएट धोरणाला प्रभावीपणें तोंड देऊं शकेल असें १९४५ सालीं अमेरिका हें एकच राष्ट्र होतें. रशियन धोरण अधिकाधिक आक्रमक होत गेल्यानें पाश्चात्य गटाची उभारणी करण्याची जबाबदारी अमेरिकेस स्वीकारावी लागली. व पुढें १९४७ ते ५० च्या काळांत नाटोची उभारणी झाली. पश्चिम युरोपच्या दृष्टीनें अटलांटिक करार टिकविण्याचा तोच मार्ग होता. अण्वस्त्रांच्या बाबतींतल्या अमेरिकन नेतृत्वामुळें सर्वांना सुरक्षिततेची हमी वाटत होती; आर्थिक दौर्बल्यामुळें पाश्चात्य राष्ट्रांना अमेरिकेच्या आर्थिक साहाय्याची गरज होती; व रशियाच्या ताठरतेमुळें सर्वांनाच त्याचा धोका वाटत होता. यामुळें सामान्य विरोधकाविरुद्ध सामर्थ्याची उभारणी करण्याच्या हेतूनें नाटोचा जन्म झाला. आज दहा वर्षांनंतर नाटो ही प्रभावी संरक्षक संघटना म्हणून दिसत असली तरी अटलांटिक करार व पाश्चात्य राष्ट्रांच्या रक्षणाचा प्रश्न यांचा संबंध आतां कच्चा झाला आहे. एकतर अमेरिकन अण्वस्त्रांमुळें आतां पूर्वीसारखी सुरक्षिततेची हमी वाटत नाहीं. दुसरें आर्थिक साहाय्याचें कार्य यशस्वी झाल्यानें पाश्चात्य राष्ट्रांत साहजिकच स्वावलंबी व स्वतंत्र वृत्ति निर्माण झाली आहे. व सोविएट परराष्ट्रीय धोरणानें "नवा बुरखा" घेतल्यानें व लष्करी सामर्थ्याऐवजीं शांततामय सहजीवनाची कल्पना त्यांत आल्यानें पाश्चात्य ऐक्याची गरज सौम्य होऊं लागली आहे. तथापि त्यामुळें नाटोच्या मुळाशीं असलेल्या समान हितसंबंधाची भावना मात्र नाहीशी झालेली नाहीं. नाटो ही संरक्षक संघटना आहे. युद्धांत विजय मिळविणें हा तिचा हेतु नसून युद्ध अंतिम हिताचें ठरणार नाहीं ही जाणीव सोविएटला देणें यासाठीं ती अस्तित्वांत आली आहे. पश्चिम युरोपचें स्वातंत्र्ययुद्ध न करतां अबाधित राखणें हें तिचें उद्दिष्ट आहे. तथापि अलीकडील तंत्रविद्येच्या विकासामुळें नाटोपुढील समस्या स्पष्ट होऊं लागली आहे. युद्धाचा संभव कमी करण्याचें सामर्थ्य तरी या संघटनेंत हवें नाहींतर युद्ध झाल्यास संरक्षणाची हमी तरी तिच्याद्वारां मिळाली पाहिजे.







कम्युनिस्ट चीनचें आक्रमक धोरण स्पष्ट होईपर्यंत संरक्षक करारांचें धोरण आशियांत अवलंबिण्याचा प्रयत्न अमेरिकेनें केला नाहीं. कोरियांतील युद्धानंतर मात्र फिलिपाइन्स्, ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड यांच्या-तील १९५१ सालचा करार, जपानशीं १९५१ सालीं झालेला करार व कोरियन प्रजासत्ताकाशीं १९५३ सालीं झालेला परस्परसंरक्षण करार हीं अशा प्रकारच्या करारांचीं उदाहरणें म्हणून देतां येतील. व त्यानंतरचें महत्त्वाचें उदाहरण म्हणजे कम्युनिझमच्या इंडोचायनांतील आक्रमणानंतर झालेल्या मॅनिला कराराचें. भारत, ब्रम्हदेश, सिलोन व इंडोनेशिया हीं महत्त्वाचीं राष्ट्रें या कराराबाहेर राहिल्यामुळें त्यांचें लष्करी दृष्टीनें फारसें महत्त्व नाहीं. लष्करी शक्तीच्या बळावर होऊं पहाणाऱ्या कम्युनिझमच्या प्रसारास आळा घालणें हा अमेरिकेचा या करारामागील हेतु. परंतु हा धोका नजीकचा नव्हता व सर्वांनीं मिळून कृति करणेंहि कठीण होतें. यामुळें या करारांत सामील झालेल्या राष्ट्रांची जबाबदारी केवळ कम्युनिझम विरोधी भूमिकेपुरतीच मर्यादित राहिली आहे. मात्र यत्किंचित् लष्करी फायद्यासाठीं या प्रदेशांत अमेरिकेला जबर राजकीय किंमत द्यावी लागली आहे. पाकिस्तानला दिलेल्या लष्करी मदतीचा भारतावर झालेला राजकीय परिणाम हें याचें महत्त्वाचें उदाहरण होय. १९५४ च्या डिसेंबरमध्यें अमेरिकेनें अशाच प्रकारें फॉर्मोसांतील चिनी सरकारशीं करार केला असून त्यायोगानें फॉर्मोसाच्या सामुद्रधुनींत संरक्षणाव्यतिरिक्त अन्य कारणास्तव लष्करी सामर्थ्याचा एकपक्षीय उपयोग होणार नाहीं याची तरतूद केली आहे.

कम्युनिझमचा प्रभावी प्रतिकार करणाचीं केंद्रें या करारांमुळें निर्माण झालीं असें म्हटलें जातें. तथापि त्यांच्या योगानें वरील हेतूच्या मर्यादाहि स्पष्ट होतात. जगाची दोन गटांत विभागणी झाली असून कोणत्याहि राष्ट्रास आतां तटस्थ राहण्याचा हक्क नाहीं असें त्यांतील गृहीतकृत्य आहे. डलेसनें या भूमिकेचा वेळोवेळीं उच्चार केला व अगदीं अपवादभूत परिस्थितिवगळल्यास तटस्थतेची भूमिका अदूरदर्शी व अनैतिक आहे असें म्हणण्यापर्यंतहि मजल मारली. अशा प्रकारें वीस वर्षांपूर्वी अमेरिका उपभोगित असलेलें स्वातंत्र्य आतां इतरांनीं उपभोगतां नये असें आपण म्हणूं लागलों आहोंत.

जगाची दोन गटांत विभागणी झाली आहे ही कल्पना बहुसंख्य राष्ट्रांना अमान्य आहे. पाश्चात्य राष्ट्रांशीं कसलाहि लष्करी करार करण्याचें ते नाकारतात; कारण युद्धोत्तर जागतिक राजकारणाचें स्वरूप त्यांना स्थिरावलेलें वा टिकाऊ वाटत नाहीं. जगांतील निरनिराळया राष्ट्रांची शत्रू, मित्र व तटस्थ अशी स्पष्ट विभागणी करतां येईल ही कल्पनाच त्यांना अवास्तव वाटते; कारण राष्ट्रीय हितसंबंध अजून बव्हंशीं प्रवाही स्वरूपांत आहेत. युरोपबाहेर नांटो संघटना फारशी प्रभावी ठरली नाहीं; कारण तेथें विशेष हितैक्य नाहीं. गेल्या दहा वर्षांतील बहुतेक कलहांत अमेरिकेचे युरोपीय व आशियाई दोस्त तटस्थतेच्या भूमिकेवरूनच वावरले आहेत. परिस्थिति व विशिष्ट घटक यावरच आंतरराष्ट्रीय संबंध अवलंबून असतात; केवळ करारावर सह्या केल्यानें ते निश्चित होऊं शकत नाहींत. या दृष्टीनें पाहिल्यास अमेरिकेचा मित्र जोडण्याचा प्रकार परराष्ट्रीय धोरणाबाबतच्या केवळ औपचारिक वा कायदेशीर दृष्टिकोणाचा सूचक आहे. हॅन्स मॉर्गेन्थो म्हणतात : "मैत्रीचे करार उपकारक, घातक वा अनावश्यक ठरूं शकतात; व ही गोष्ट विशिष्ट परिस्थितीवर अवलंबून असते. यामुळें साधावयाचीं उद्दिष्टें वा अंमलांत आणायचीं धोरणें डोळयापुढें ठेऊन त्यांच्या बाबतींत तरतम विवेक बाळगावा लागतो. तथापि तसें वागण्याऐवजीं आम्हीं केवळ मित्र गोळा करण्याचा उपक्रम सुरूं केला आहे. जितकीं अधिक राष्ट्रें आमच्या धोरणास पाठिंबा देणाऱ्या करारपत्रावर सह्या करतील तितकें चांगलें असें आम्हांस वाटतें. एकेकाळीं कारारमदाराच्या भानगडींत न पडणें ही आमची तत्त्वनिष्ठा होती; आतां करार करणें हेंच आम्हास एक तत्त्व वाटतें.

जेव्हां उभय पक्षांना संरक्षण आवश्यक असतें व संरक्षणकार्याचें स्वरूप लष्करी असतें तेव्हांच करार हे प्रभावी धोरणाचे आविष्कार बनतात. अशा प्रकारच्या घटकांमुळेंच नाटो ही उपयुक्त व आवश्यक संघटना झाली आहे. तथापि आशियामध्यें प्रस्थापित व्यवस्थेविरुद्ध येणारें दडपण हें अंतर्गत व राजकीय स्वरूपाचें आहे; बाह्य व लष्करी स्वरूपाचें नाहीं. अशा परिस्थितींत करार उपयुक्त ठरूं शकत नाहींत; उलट त्यायोगें होऊं पहाणारे बदल अडविण्याची वृत्ति







दिसते. बदलाचें स्वरूप व दिशा यांचें योग्य विश्लेषण करण्याऐवजीं केवळ सद्या गोळा करण्याची प्रवृत्ति दिसते.

केवळ लष्करी दृष्टीनें विचार केला तरीदेखील आशिया खंडांतील विरोध प्रभावी बनण्याचा लष्करी करार हा मार्ग नव्हे. त्यांच्यामुळें "क्रांति" ही केवळ मॉस्को वा पेकिंगलाच हवी आहे. असा समज निर्माण होतो; व अमेरिकेनें पुरस्कारलेल्या करारांना केवळ कम्युनिझम विरोधाचें राजकीय स्वरूप प्राप्त होतें. आशियाई राष्ट्रवादाला आवश्यक असलेले बदल त्यांच्या योगानें नाकारले जातात. केवळ प्रस्थापित परिस्थिति टिकून धरण्याचे प्रयत्न करणें हें आशियाई राज्यकर्त्यांच्या दृष्टीनें अनिष्ट तर आहेच; परंतु तसें करण्याची कुवतहि त्यांच्यांत नाहीं हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

### लॅटिन अमेरिकेंतील धुमसती परिस्थिति :

गेल्या फेब्रुवारी महिन्यांत अमेरिकेचे अध्यक्ष आयूसेनॉवर यांनीं अर्जेंटिना, ब्राझील, चाइल व युरग्वेप या लॅटिन अमेरिकन राष्ट्रांना भेट दिली. व आतां क्रुश्चेव्ह तिकडे जाणार आहे. आजवर अमेरिकन राष्ट्रकुलांतल्या म्हणून गणल्या जाणाऱ्या या खंडाला आतां जागतिक राजकारणांत नवें महत्त्व प्राप्त होऊं पहात आहे. या दृष्टीनें रॉयल इंस्टिटयूट ऑफ् इंटरनॅशनल् अफेअर्सच्या "दि वर्ल्ड टुडे" या मासिक पत्रिकेच्या एप्रिल १९६० च्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या अब्रूयू मार्शल यांच्या एका लेखाचा हा सारांश 'नवभारत' च्या वाचकांना उपयुक्त होईल असें वाटतें.

अमेरिका व तिचे दक्षिणेकडील शेजारी यांच्यांत निर्माण होऊं लागलेले गैरसमज व त्यांतून उद्भवणाऱ्या अनिष्ट भावना दूर करणें हा आइसेनॉवर यांच्या दौऱ्याचा हेतु होता. अर्जेंटिना ते मेक्सिकोपर्यंत कमीअधिक प्रमाणांत सगळीकडेच अमेरिकेविरुद्ध लोकमत आढळतें. व क्युबा हें त्यांतलेंच एक आत्यंतिक उदाहरण. आर्जेंटिनामध्यें पेरॉंची कारकीर्द संपल्यानंतर बव्हंशी अमेरिकेच्या साहाय्यानेंच आर्थिक पुनरुत्थान झालें असूनहि अमेरिकन अध्यक्षांच्या भेटीबद्दल तेथें उदासीनताच आढळली. याचें कारण मदतकरतांना आंतरराष्ट्रीय चलन-निधीनें तयार केलेली काटकसर योजना अंमलांत आणली पाहिजे अशी अट घालण्यांत आली. ही अट आर्जेंटिनाच्या अंतिम हिताची असेलहि. पण तिचा तात्कालिक परिणाम म्हणून राहणीचा खर्च भरमसाट वाढला. फ्रॉंदिझी राजवटीचें काम अधिक बिकट झालें व अट न लादतां अमेरिका मदत करूं शकली असती हा कम्युनिस्ट प्रचार लोकांत रुजूं लागला. याच अटीवर देऊं केलेली मदत गतवर्षी ब्राझीलनें नाकारली. त्यांच्या मतें तिच्यांतून उद्भवणाऱ्या सामाजिक व राजकीय अशांततेचा धोका कितीतरी मोठा होता. येथें लोकांनीं उत्साहानें अध्यक्षांचें स्वागत केलें खरें; पण त्यांची भेट ही क्युबाबाबत कडक धोरण स्वीकारल्यास त्यास ब्राझीलनें पाठिंबा द्यावा या हेतूनें आहे अशी अफवा पसरल्यामुळें आयसेनॉवर तेथून परत फिरण्यापूर्वीच त्या उत्साहावर विरजण पडलें. याखेरीज पाठिंब्याचा मोबदला म्हणून ब्राझीलला कर्ज देण्यांत येईल, क्यूबाऐवजीं तेथून अधिक साखर आयात केली जाईल असेंहि म्हणण्यांत येत होतें. या सर्व केवळ अफवाहि असतील, परंतु त्यावरून अमेरिकन धोरणाविषयीं कसे गैरसमज पसरत गेले हें स्पष्ट होतें. अमेरिकन अध्यक्षांच्या भेटीनंतर आर्थिक साहाय्य देण्याच्या धोरणांत महत्त्वाचे फेरबदल होतील अशी अपेक्षा ब्राझीलच्या जनतेनें बाळगली होती. परंतु भेटीनंतर तो एक भ्रमच होता असा समज सर्वत्र पसरूं लागला.

लॅटिन अमेरिकेंतील लोकमत अत्यंत झपाट्यानें बदलत आहे. व त्यामुळें अमेरिकेची मनःस्थिति कांहींशी गोंधळल्यासारखी झाली आहे. तेथील अमेरिकाविरोधी वातावरण मूठभर चळवळया लोकांनीं निर्माण केलें आहे असें मानण्याची आजवरची पद्धत होती. कम्युनिस्ट व राष्ट्रवादी यांनीं तेथील वातावरण अधिक तप्त केलें असेलहि; परंतु तें निर्माण करण्याची जबाबदारी त्यांची नाहीं. तर मग या घटनांचीं कारणें कोणतीं ? कांहीं कारणें अत्यंत खोलवर रुजलेलीं आहेत. मध्य अमेरिकेंत अलीकडच्या भूतकाळांत अमेरिकेनें केलेल्या आर्थिक व लष्करी हस्तक्षेपाबद्दल राग आहे. त्याचप्रमाणें युद्धोत्तर काळांतील अमेरिकन धोरणाविषयीं तेथें कटुता आहे. नवोदित लोकशाही लोकमताविषयीं विशेष दक्ष असते; हुकूमशाहीचें तसें नाहीं, म्हणून हुकूमशाहीशीं आर्थिक व्यवहार करणें अधिक सुलभ असतें या प्रमेयाच्या आहारीं जाऊन तेथील झोटिंगशाह्या उलथून टाकण्याच्या जनतेच्या








प्रयत्नाबद्दल अमेरिका उदासीन असते असें एक महत्त्वाचें गाऱ्हाणें तेथें आढळतें.

दुसरें अलीकडचें गाऱ्हाणें म्हणजे हीं सारीं राष्ट्रें पाश्चात्य गटांत आहेतच असें गृहीत धरून चालण्याची प्रवृत्ति हें होय. त्यांनीं आपलें परराष्ट्रीय धोरण अमेरिकेच्या कलानें आखावें, रशियाशीं साधे व्यापारी-संबंध देखील ठेऊं नयेत अशी अपेक्षा. त्यांच्या मागासलेपणामुळें निर्माण होणारा कम्युनिझमचा अंतर्गत धोका टाळण्यासाठीं आवश्यक आर्थिक साहाय्य करण्याची मात्र अमेरिकेची मुळींच तयारी नाहीं. या राष्ट्रांतील लोकसंख्या आशियापेक्षांहि अधिक झपाट्यानें वाढत आहे. त्यांतील वीस कोटी प्रजेपैकीं निम्मेच पोटापुरती कमाई करूं शकतात अशी अवस्था आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर अमेरिकेनें परराष्ट्रांना सुमारें ३१५० कोटी डॉलर्सची मदत केली. यांतील लॅटिन अमेरिकेचा हिस्सा दोन टक्क्याहून अधिक नाहीं. "आयात-निर्यात बँकेचें कर्ज व सुमारें २५०० कोटी डॉलर्स इतकें खाजगी भांडवल लॅटिन अमेरिकेंत गेलें हें खरें. परंतु ही मदत होय हें म्हणणें त्यांना मान्य नाहीं. हा केवळ व्यवहार किंवा धंदा होय असें ते समजतात. बँकेच्या कर्जांतून इतरत्र स्वस्त मिळणारा माल अमेरिकेकडून अधिक दरानें घ्यावा लागतो; व खाजगी भांडवल कांहीं वेळां अंतर्गत व्यवहारांत ढवळाढवळ करूं लागतें. लॅटिन अमेरिकेंतून आयात होणाऱ्या कॉफी व विविध धातूंवर अमेरिका भावनियंत्रण लादते व आयातीचें प्रमाण ( कोटा ) ठरवते. यामुळें एका रात्रींत या राष्ट्रांच्या आर्थिक जीवनांत उलथापालथ करण्याचें सामर्थ्य अमेरिकेजवळ आहे. या सर्व गाऱ्हाण्यांत अतिशयोक्ति असेलहि. परंतु बहुसंख्य लॅटिन अमेरिकन प्रजेला तीं रास्त वाटतात ही खरी अडचण आहे. व सोविएट व चिनी प्रचारयंत्रांनीं त्यांचा भरपूर उपयोग करून घेतला आहे. याविषयीं अजून अमेरिकेलादेखील पुरती जाणीव दिसत नाहीं.

या परिस्थितीवर रशियाचा तोडगा सोपा आहे. व्यापार व प्रसंगीं केवळ विशिष्ट मालाची देवघेव करण्याची तयारी त्यांनें दाखविली आहे. तसेंच आर्थिक विकासाच्या गरजेविषयीं आस्था व मदत करण्याची तयारी तो पाश्चात्य राष्ट्रांपेक्षां कितीतरी अधिक प्रमाणांत दाखवीत आहे. चिनी प्रचार तर यापेक्षाहि अधिक सूक्ष्म आहे. " दोन्ही प्रदेश मागासलेले असून त्यामुळें त्यांत बरेंच साम्य आहे. सोविएट व विशेषतः चीनच्या मार्गानें लॅटिन अमेरिकेंत वेगानें औद्योगीकरण होणें शक्य आहे. लॅटिन अमेरिका आपल्या नियंत्रणाखालीं राहिल्यावांचून तेथें औद्योगीकरण होणें पाश्चात्यांना इष्ट वाटत नाहीं; " असा त्या प्रचाराचा रोख आहे. गेल्या कांहीं वर्षांत कित्येक लॅटिन अमेरिकन चीनमध्यें जाऊन तेथील परिस्थितीचें नियंत्रित दर्शन घेऊन व त्या योगानें प्रभावित होऊन आले आहेत.

लॅटिन अमेरिकन प्रजा मुळांत पश्चिम युरोपांतली, धर्मानें कॅथॉलिक पंथाची, व हंगेरीच्या अनुभवानें नुकताच धक्का बसलेली. असें असूनहि रशियाशीं संबंध वाढवले पाहिजेत असें तिला वाटतें तरी कसें ? एकतर हंगेरीनंतर बराच काळ लोटला आहे. दुसरें म्हणजे क्यूबा, ब्राझील, चाइल इत्यादि रशियाशीं व्यापारी करार केलेले लोक कम्युनिस्टांशीं व्यापार करायला कम्युनिस्टच व्हावें लागतें असें नाहीं असें म्हणतांना आढळतात. त्यांना खरी चिंता आहे आर्थिक विकासाची. रशिया जर मदत करीत असेल तर ती कां स्वीकारूं नये; कदाचित् मागील चुकांबद्दल रशियालाहि पश्चात्ताप होत असेल; असें त्यांना वाटतें. अर्थात् या व्यापारी संबंधांतून राजकीय संबंध येणें अपरिहार्यच आहे. लॅटिन अमेरिकेंतील आणखी एक नवा घटक म्हणजे तेथें झालेली ऐक्यभावनेची वाढ हा होय. पूर्वीं या प्रदेशांतील राष्ट्रांना भौगोलिक अंतर व वहातुकीच्या साधनांचा अभाव यामुळें आपण एकमेकांपासून कितीतरी दूर आहोंत असें वाटे. आतां ती परिस्थिति राहिलेली नाहीं. उलट एकत्र राहिलों तरच आपला निभाव लागूं शकेल याविषयीं त्यांची खात्री झाली आहे.

आंतरराष्ट्रीय दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास हीं राष्ट्रें आतां अधिकाधिक प्रमाणांत तटस्थतेच्या भूमिकेकडे झुकूं लागलीं आहेत. आयसेनॉवर यांच्या भेटींत ब्राझीलचे अध्यक्ष कुबित्शेक यांनीं ही गोष्ट स्पष्टपणें बोलून दाखविली. अर्थात् ही सर्वस्वीं खरी नाहीं. तथापि अमेरिका या राष्ट्रांनीं पाश्चात्यांवर निष्ठा ठेवणें हें त्यांचें जणुं कर्तव्यच समजते ही खरी अडचण आहे. अमेरिकेवर फारसें अवलंबून राहावें लागूं नये म्हणून हीं राष्ट्रें युरोपशीं व्यापारीसंबंध जोडूं लागलीं आहेत.





अनुक्रमणिका

उदा० कॅस्ट्रो सरकार अधिकारावर आल्यानंतर ब्रिटन व क्यूबाचा व्यापार दुप्पट झाला. गतवर्षी संरक्षणासाठीं क्यूबानें मागितलेलीं पंधरा जेट विमानें देण्याचें ब्रिटननें नाकारल्यामुळें मात्र क्यूबाची निराशा झाली. ब्रिटन्‌देखील अमेरिकेच्या तंत्रानेंच वागत आहे असें त्यास वाटूं लागलें आहे.

लॅटिन अमेरिकेच्या विकासासाठीं तांत्रिक व आर्थिक साहाय्य पुरविण्याचा प्रश्न यापुढें फक्त अमेरिका सोडवूं शकेल असें वाटत नाहीं. लॅटिन अमेरिकन राष्ट्रें कळत न कळत सोविएटच्या वर्चस्वाखालीं जाऊं नयेत असें वाटत असल्यास सर्व पाश्चात्य राष्ट्रांनीं मिळून हा प्रश्न सोडवला पाहिजे. लॅटिन अमेरिकेच्या दारांत सोविएटनें पाऊल ठेवलें आहेच. पाश्चात्य राष्ट्रें घेणार नाहींत तो माल घेऊन मोबदल्यांत लॅटिन अमेरिकेस विकत घेणें अशक्य असलेलीं विकाससाधनें देण्यास रशिया तयार आहे. या बाबतींत अमेरिकेव्यतिरिक्त इतर पाश्चात्य राष्ट्रांकडून, विशेषतः ब्रिटनकडून, या राष्ट्रांच्या कांहीं अपेक्षा आहेत. त्या पुऱ्या कां होऊं नयेत.

१९१० च्या मेक्सिकोंतील क्रांतीपासून युद्धोत्तर काळांतील लोकशाहीच्या प्रसारापर्यंतच्या काळांत लॅटिन अमेरिका निरनिराळ्या संक्रमणांतून गेली आहे. आज हे प्रदेश अत्यंत मोठ्या संक्रमणांतून जात आहेत. त्यांनीं विकासाचा असा कांहीं टप्पा गाठला आहे कीं तेथून परतणें त्यांना शक्य नाहीं. तसें केल्यास केवळ लोकसंख्येच्या वाढीमुळेंच तेथें आफ्रिकेपेक्षाहि मोठी सामाजिक उलथापालथ होईल; भयावह दारिद्र्य येईल. अनेक लॅटिन अमेरिकन्सना याबद्दलची जाणीव आहे. व म्हणूनच विकासाची त्यांना निकड असल्याचें दिसून येतें. पाश्चात्यांकडून साहाय्य न मिळाल्यास ते पूर्वेकडे वळतील. गेलीं दहा वर्षें लॅटिन अमेरिकेंत अनेक बदल होत आहेत. व पुढील दहा वर्षांत त्याहूनहि अधिक होतील. मात्र त्यांचें स्वरूप पाश्चात्य राष्ट्रें लॅटिन अमेरिकेच्या प्रश्नाकडे कोणत्या दृष्टिकोणांतून पाहातात यावर अवलंबून राहील.

## युगोस्लावियांतील निवडणूक पद्धति :

श्री. जयप्रकाश नारायण यांनीं भारतीय राजकीय जीवनाची नव्यानें मांडणी करण्याचा मार्ग नुकताच एका प्रबंधरूपानें पुढें मांडला असून त्यांत ग्रामपंचायतीच्या निवडणुका एकमतानें किंवा चिठ्ठ्या टाकून कराव्यात अशी सूचना केली आहे. यापूर्वी श्री. एम्‌. एन्‌. रॉय यांनी या निवडणुका सर्व नागरिकांकरवीं प्रत्यक्षरीतीनें व्हाव्यात असा पर्याय सुचविला होता हें प्रसिद्ध आहे. युगोस्लाविया हें कम्युनिस्ट राज्य खरें; परंतु तेथें गेले कांहीं दिवस राजकीय व आर्थिक जीवनाची पुनर्मांडणी करण्याचे नवनवे प्रयोग सुरूं आहेत. विशेषतः तेथें होत असलेले संस्थात्मक बदल हे नवे व विचारार्ह आहेत. या दृष्टीनें सर्बियांत झालेल्या स्थानिक संस्थांच्या निवडणुकीविषयीं बेलग्रेडच्या "युगोस्लाव लाइफ" च्या एप्रिल १९६० च्या अकांत प्रसिद्ध झालेली पुढील माहिती 'नवभारत' च्या वाचकांस उद्बोधक वाटेल असें वाटतें.

या निवडणुकांत सुमारें ९० टक्के मतदान झालें. निवडणुका होण्यापूर्वी त्यासाठीं व्यापक प्रमाणांत राजकीय तयारी करण्यांत आली. मोठमोठ्या सभा, मिरवणुका इत्यादि होतांना दिसल्या नाहींत हें खरें, पण स्थानिक संस्थांचें कार्य, शेती व उद्योगधंदे यांचा झालेला पुढें करावयाचा विकास, सांस्कृतिक जीवन, घरें बांधण्याविषयींचें धोरण, पुरवठा, शिक्षण, आरोग्य इत्यादि विविध प्रश्नांची नागरिकांनीं चर्चा केली.

निवडणुकांतील उमेदवार निवडण्याची पद्धत पुढीलप्रमाणें आहे. स्थानिक जनता समित्यासाठीं निवडावयाचे उमेदवार नागरिकांच्या जाहीर सभांतून ठरविण्यांत येतात. स्थानिक स्वराज्य संस्थासाठीं निवडायचे उमेदवार निरनिराळ्या मतदारसंघातील मतदारांच्या सभांतून ठरविले जातात. उत्पादक समित्यांवर निवडायचे उमेदवार कारखाने व सहकारी संस्थांतील कामगारांच्या सभांतून ठरवले जातात. या सभांमध्यें प्रत्येक मतदारास उमेदवार सुचविण्याचा हक्क असतो. मतदारांच्या सभेतूनच एका खास समितीची निवड करण्यांत येते; व ही समिति व्यक्तिगत मतदारांनीं सुचविलेल्या नांवांची यादी तयार करून पुढें ठेवते. मतदारांच्या सभांतून ज्यांना मताधिक्य मिळेल अशांचींच नांवें या अखेरच्या यादींत समाविष्ट केलीं जातात. अशीं नांवें किती असावींत याविषयीं निर्बंध नाहींत. समितीनें तयार केलेली यादी मतदारांना पसंत नसल्यास नवी समिति निवडण्यांत येते. यादीव्यतिरिक्त कोणत्याहि पन्नास मतदारांच्या



अनुक्रमणिका

गटाला उमेदवार सुचवितां येतात. निवडणुका प्रत्यक्ष पद्धतीनें होतात. म्हणजे मतदानाच्या हक्कानुसार सर्व मतदार प्रतिनिधींची निवड करण्यांत भाग घेतात. मतदान गुप्त असतें. यादींतील सर्व उमेदवारांचीं नांवें मतपत्रिकेवर असतात व मतदार त्यांतील हव्या असलेल्या नांवाखालीं रेघ ओढतो. मतांची मोजणी होऊन निकाल जाहीर केला जातो.

या पद्धतीनें होणाऱ्या मतदानांत मतदार जिव्हाळयानें भाग घेतात. हा जिव्हाळा दिवसेंदिवस वाढत आहे. स्थानिक संस्थांना बरेच अधिकार देण्यांत आल्यामुळें मतदारांतील जागरूकता वाढण्यास मदत झाली आहे. नुकत्याच झालेल्या निवडणुकांत एकूण जागांच्या दुप्पट उमेदवारसंख्या होती. स्थानिक संस्थांत एकूण ११११२६ जागासाठीं २०८११ उमेदवार उभे होते. तसेंच उत्पादन समित्यांवरील एकूण ९०५७ जागांसाठीं उमेदवारांची संख्या १६४२५ इतकी होती. निवडून आलेल्या सभासदांत सुमारें ६० टक्के सभासद नवे म्हणजे प्रथमच निवडून आलेले आहेत. उभ्या राहिलेल्या उमेदवारांत मतदारांच्या सभांव्यतिरिक्त मतदारांनीं स्वतंत्रपणें उभ्या केलेल्या उमेदवारांची संख्या १७ इतकी होती, हें विशेष नमूद करणें आवश्यक आहे.

## शिखरपरिषदेच्या अपयशाची एक मीमांसा :

गेल्या महिन्यांत पॅरिस येथें होऊं घातलेल्या शिखर-परिषदेचा बोजवारा उडाला. त्यावेळीं निर्माण झालेलें तंग वातावरण आतां हळुहळु निवळेल असें वाटत आहे. परिषदेच्या या अपयशाची मीमांसा न्यूयॉर्क टाइम्सचे सोविएटतज्ञ श्री. एच्. इ. सॅलिस्बरी यांनीं "न्यू लीडर" च्या ता० २३ मे १९६० च्या अंकांतील एका लेखांत केली आहे. तिचा हा थोडक्यांत सारांश :

जागतिक परिस्थितींतील ताण कमी करण्याच्या दृष्टीनें आयसेनॉवर राजवटीशीं सहकार्य करून अधिक प्रगति अशक्य आहे हा क्रुश्चेव्हचा निर्णय परिषद मोडण्याचें खरें कारण होय. प्रगतीची शक्यता कांहीं महिन्यापूर्वीच त्याला दिसत होती. यामुळें असा निर्णय त्यानें कां घ्यावा हे वरवर स्पष्ट होत नाहीं. पण यू २ विमानाचें प्रकरण घडण्यापूर्वीच तो या निर्णयावर आला असला पाहिजे. या प्रकरणामुळें निर्णय अंमलांत आणण्यासाठीं व त्या निमित्तानें कांगावा करण्यास त्याला संधि मिळाली इतकेंच.

क्रुश्चेव्हच्या समजूतदार धोरणाला पक्षाच्या वरिष्ठ वर्तुळांत मॉस्को व पेकिंग अशा दोन्ही ठिकाणीं नेहमींच विरोध होता. अनेक मोठमोठया अधिकाऱ्यांना या धोरणाच्या यशाविषयीं शंका होती. अमेरिकेचा दौरा "यशस्वी" झाल्यामुळें क्रुश्चेव्हला आपल्या विरोधकांवर तात्पुरता जय मिळाल्यासारखें दिसलें. मी "यशस्वी" हा शब्द मुद्दाम वापरला आहे. अमेरिकन भूमीवर पाऊल टाकल्याबरोबर यशस्वी होण्यासाठीं आवश्यक प्रचारतंत्राचा उपयोग करण्यास त्यानें सुरवात केली. आणि परतल्यानंतर अमेरिका व रशिया, आयसेनॉवर व क्रुश्चेव्ह यांच्यांत शांततेसाठीं सहकार्य होण्याचा पाया या अमेरिकन दौऱ्यानें घातला गेला आहे ही गोष्ट सोविएट जनतेच्या व कम्युनिस्ट पक्षाच्या मनावर ठसविण्यासाठीं तुफानी प्रचार सुरू झाला. या प्रचाराचें व्यापक स्वरूप अमेरिकेच्या ध्यानांत आलें नाहीं. स्टालीन वा क्रुश्चेव्ह यांच्या आजवरच्या कोणत्याहि प्रचार मोहिमेपेक्षां ही मोहीम अधिक मोठी होती. सलोख्याच्या धोरणाला त्यायोगानें पाठिंबा मिळून विरोधकांवर स्वस्थ बसण्याची पाळी आली.

तथापि मॉस्कोंतील विरोधक शांत झाले असले तरी पेकिंगमध्यें तसें झालें नाहीं. क्रुश्चेव्हच्या दौऱ्याचा व त्यांतून सुरू झालेल्या प्रचाराचा तेथें कांहींच परिणाम झाला नाहीं. उलट अमेरिकेचे हेतु आक्रमक आहेत, शांततेला सर्वांत मोठा धोका अमेरिका हाच होय हा पेकिंग रेडियोचा प्रचार कायमच राहिला. याचा मॉस्कोवर परिणाम होत असल्याचीं चिन्हें मार्च अखेरीस व एप्रिलच्या आरंभीं दिसूं लागलीं होतीं. डग्लस दिलॉं व हर्टर यांचीं भाषणें, "अमेरिकेस शांतता नको आहे; शिखर परिषदेस आयसेनॉवर निश्चित मार्ग काढण्याच्या हेतूनें मुळीं हजर राहणारच नाहींत" असें सांगण्यासाठीं उपयोगांत आणण्यांत आलीं. मॉस्कोंत या प्रश्नासंबंधीं रण माजलें असावें याचा आणखीहि एक पुरावा देतां येतो. तो म्हणजे क्रुश्चेव्हचा विश्वस्त म्हणून प्रसिद्ध असलेला जॉर्जी झुकॉव्ह याचें न्यूयॉर्क व वॉशिंग्टन येथें झालेले आकस्मिक आगमन हा होय. तिकडे बाकूंतील आपल्या भाषणांत बर्लिन प्रश्नावर क्रुश्चेव्ह ताकीद देत होता, त्याचवेळीं इकडे अमेरिका शिखरपरिदेषेंत कोणतें धोरण स्वीकारणार याविषयीं झुकॉव्ह अंदाज घेत होता. झुकॉव्हनें



अनुक्रमणिका








दिलेला अहवाल ज्ञात नाहीं; परंतु त्यांच्या खाजगी बोलण्यावरून तो फारसा आशावादी दिसत नव्हता. अमेरिका सोडतांना त्यानें शिखर परिषदेविषयीं आशा व्यक्त केली असली तरी दिलॉं हर्टर यांच्या मार्गानें कांहींहि निष्पन्न व्हावयाचें नाहीं असेंहि स्पष्ट बजावलें होतें. एप्रिलमध्यें पक्षाच्या मध्यवर्ती समितींत क्रुश्चेव्हनें पक्षाच्या चिटणीस मंडळाची पुनः मांडणी कली व आपला वारस कॉझलॉव्ह याचा मार्ग सुलभ करण्याचा प्रयत्न केला. शिखर परिषदेचीहि चर्चा या बैठकींत झाली असावी. परिषदेच्या दिशेनें पावलें पुढें पडत असलीं तरी अभावात्मक धोरणांतून कांहींहि साध्य व्हायचें नाहीं अशी त्यानें ताकीद दिली.

ता. १ मेचा यु–२ विमानाचा प्रकार घडण्यापूर्वीची ही परिस्थिति. यांत आणखी एक घटक ध्यानांत घेतला पाहिजे. एप्रिल मधील पक्षाच्या मध्यवर्ती समितीची बैठक होण्यापूर्वी सोविएट सेनाप्रमुखांत अनेक महत्त्वाचे फेरबदल झाले. मात्र त्यांना प्रसिद्धी देण्यांत आली नाहीं. सोविएट संरक्षण मंत्री मार्शल मॅलिनॉवूस्की यांचे निकटवर्ती सहकारी मार्शल् झकॅरॉव्ह यांची मार्शल् सोकॉलॉवूस्की यांचे जागीं "चीफ् ऑफ् स्टाफ्" म्हणून झालेली नेमणुक हा यांतील सर्वांत महत्त्वाचा बदल होय व तो अत्यंत शांतपणानें, कसलाहि गाजावाजा न करतां, करण्यांत आला. दुसरा महत्त्वाचा निर्णय म्हणजे सोविएट स्वयंचलित अस्त्रांचें नियंत्रण हवाई दलाचे प्रमुख मार्शल् व्हर्शिनीन् यांजकडून काढून घेण्यांत येऊन तें तोफखान्यांचे (आर्टिलरी) प्रमुख नेदेलिन यांजकडे सोपवण्यांत आलें व या अधिकाराला हवाई दलावरील अधिक मानाचें स्थान देण्यांत आलें. अशा प्रकारें पायदळाबरोबर (लँड फोर्सेस्) सहकार्यानें काम करणाऱ्या तोफखान्याचें वजन वाढलें व हवाई दल मागें पडलें. पायदळाचें प्रमुखपद मॅलिनोवूस्कींचे स्नेही ग्रेश्को यांजकडे आहे. मार्शल् झुकॉव्हना बडतर्फ करण्यांत आलें त्यावेळीं मार्शल् कोनेव्हनें क्रुश्चेव्हला अत्यंत सहाय्य केलें होतें; आतां त्यांच्यावर सेवानिवृत्त होण्याची पाळी आली. तसेंच स्टालिनग्राडचा विजेता मार्शल् चुइकॉव्ह हा कित्येक वर्षें किव्हमध्यें सेनाप्रमुख होता. आतां तें पद त्याच्याकडून काढून घेण्यांत आलें आहे.

हे बदल स्वाभाविक वाटावेत म्हणून कोनेव्ह व सोकॉलॉवूस्की हे आजारी असल्याचें वृत्त पसरविण्यांत आलें. गेले कांहीं दिवस कोनेव्हची प्रकृति साधारण आहे हें खरें. पण सोकॉलॉवूस्की हा मॉस्कोंत कित्येक वेळां दिसला आहे. तो आजारी म्हणावा तर तसें कोणतेंहि चिन्ह दिसत नाहीं. त्याचा आजार शारीरिक नसून राजकीय आहे. तो व रॅकोसॉवूस्की हे माजी संरक्षण मंत्री झुकॉव्ह याचे दोनच अनुयायी अजून उच्च स्थानावर होते. आतां त्यांना खालीं ढकलण्यांत आलें आहे.

मॅलिनॉवस्की हा क्रुश्चेव्हचा जुना सहकारी. सलोख्याच्या धोरणाचा तो विरोधक असावासें दिसत नसलें तरी तो त्या धोरणाचा पुरस्कर्ता असेल असेंहि वाटत नाहीं. सोविएट सेनेची संहारक्षमता कमी करणाऱ्या कोणत्याहि धोरणास होणारा सैनिकी विरोध त्याच्या ठिकाणींहि दिसून येतो व सेनाप्रमुखांत झालेल्या बदलांमुळें त्याचें महत्त्व वाढलें आहे. सैन्यांत व विशेषतः अधिकाऱ्यांच्या संख्येंत कपात करण्याचें क्रुश्चेव्हचें धोरण लष्कराला सर्वस्वी नापसंत आहे. पक्षाला या विरोधाची काळजी वाटते म्हणूनच ही कपात करण्यांत येत असतांना सामुदायिक शेतें वा कारखाने येथें अधिकाऱ्यांना कसल्याहि अडचणी सोसाव्या लागणार नाहींत अशी प्रचार–मोहीम सुरूं झाली होती. हा प्रचार प्रभावी झाल्याचीं चिन्हें दिसत नाहींत. या प्रचाराचें कार्य क्रुश्चेव्हच्या विश्वासांतला एकमेव स्टालिनवादी सुस्लॉव्ह यांजवर सोपविण्यांत आलें होतें. कदाचित् क्रुश्चेव्हच्या "जहाल" धोरणाविरुद्ध अधिकाऱ्यांविषयीं सहानुभूति व्यक्त करण्यासाठीं त्यानें या संधीचा उपयोग केला असावा. कांहींहि असलें तरी शिखर परिषदेंत कसलेंहि समझोत्याचें धोरण स्वीकारण्याच्या क्रुश्चेव्हच्या दृष्टिकोणाला १ मेच्या पूर्वीच भरपूर अंतर्गत विरोध होता हें स्पष्ट आहे. आयसेनॉवरशीं बोलणीं करण्याचें त्यानें मान्य केलें असल्यानेंच हा विरोध अधिक तीव्र स्वरूपांत प्रकट होऊं शकला नाहीं.

यानंतर यु–२ ची घटना घडली; व क्रुश्चेव्हच्या विरोधकांना अनायासें चांगलीच संधी मिळाली. आरंभीं ह्या घटनेचाहि आपण उपयोग करून घेऊं शकूं असें क्रुश्चेव्हला वाटत होतें. त्यानें आयसेनॉवर








वा अमेरिकन शासनयंत्राचा या घटनेशीं संबंध नसावा असें सूचित करून पाहिलें; व आयसेनॉवर यांना आपला संबंध नाहीं असें औपचारिकरीत्या सांगण्याचा मार्ग खुला ठेवला. शिखर परिषदेवर या प्रकाराचा थोडाफार परिणाम राहील; परंतु आपण तिचा फायदा घेऊन विरोधकांवर मात करूं शकूं असें त्यास वाटत असावें. तथापि हा डाव सफल होऊं शकला नाहीं. विमानाच्या भ्रमणाबद्दल आपली जबाबदारी नाकारण्याऐवजीं आयसेनॉवर यांनीं तीं स्वीकारली व हर्टरनें तर अशीं टेहाळणी करणारीं विमानें पाठवणें हा एक नित्याचाच क्रम असून तो पुढेंहि चालूं राहील असें म्हटलें. यामुळें क्रुश्चेव्हच्या पायाखालची जमीनच नाहीशी झाल्यासारखें झालें. अंतर्गत विरोध व चीनची विरोधी भूमिका ध्यानांत घेतां धोरणांत पुनः "कडकपणा" आणण्यांवाचून त्याला दुसरा मार्गच शिल्लक राहिला नाहीं. हा निर्णय त्याच्या स्वभावानुसार पूर्णतया नाट्यमय रीतीनें अंमलांत आणला व आयसेनॉवरशीं सलोखा करण्याचें धोरण सर्वस्वी धुडकावून दिलें. या राजवटीशीं बोलणीं अशक्य, पुढच्या राजवटीशीं कसें काय जमेल तें पाहूं; तेंहि न जमल्यास त्यानंतर; असें त्याचें म्हणणें.

तथापि हें म्हणणें सोपें आहे. "कडक" धोरणाच्या पुरस्कर्त्यांचा वरचष्मा झाल्यानंतर कांहीं महिन्यांनीं पुनः बोलणीं सुरूं करणें कठिण होईल. अशा परिस्थितीचेंहि कांहींएक तर्कशास्त्र असतें व तें भावी दिशा निश्चित करीत असतें. शिखर परिषदेसाठीं आवश्यक वातावरण उभयपक्षीं कित्येक वर्षांच्या प्रयत्नांनीं निर्माण करण्यांत आलें होतें. तें पुनः निर्माण करणें सोपें नाहीं. परंतु क्रुश्चेव्ह हा निग्रही माणूस आहे. कांहीं मूलभूत प्रमेयांपासून सोविएट धोरण विचलित झाल्यास तें पुनः मूळपदावर आणण्याची कुवत त्याच्या ठिकाणीं आहे. सलोख्याच्या धोरणाचा अवलंब करण्यासाठीं त्याला उद्युक्त करणारे घटक अजून कायम आहेत. पुनः शिखर परिषद होण्याची अजूनहि आशा कायम राहूं शकते ती यामुळेंच !

श्री. चिकित्सक

# " नवीन महाराष्ट्राचें राजकारण "

नवभारत मे १९६० च्या अंकांत प्राचार्य अ. भि. शहा यांनीं " नवीन महाराष्ट्राचें राजकारण " या शीर्षकाचा एक विचारप्रवर्तक व विचारप्रक्षोभक लेख लिहिलेला आहे. या लेखांत महाराष्ट्रांतील जातिबद्ध समाजरचनेची नाडी पाहून या समाजपुरुषाच्या रोगाचें निदान केलें आहे. नवीन महाराष्ट्राचें राजकारण कोणत्या ग्रहचक्रांच्या फेऱ्यांत सांपडण्याचा संभव आहे त्याचें भविष्य त्यांनीं वर्तविलें असून तें गंडांतर टाळण्यासाठीं विशिष्ट स्मृतिहि सांगितली आहे. ' महाराष्ट्राच्या जातिबद्ध समाजरचनेशीं संलग्न नसलेल्या दृष्टिकोनांतून ' म्हणजे प्रांतबाह्य तटस्थ दृष्टिकोनांतून त्यांनीं हा विचार मांडलेला आहे. लोकशाहीच्या भवितव्यासाठीं व महाराष्ट्राच्या सर्वसामान्य माणसाबद्दल प्रेम वाटतें या कारणासाठीं आपण ही चिकित्सा केली आहे असें त्यांनीं प्रारंभींच सांगितलें आहे. प्रा. शहांचें विवेचन सडेतोड व अत्यंत कळकळीनें मांडलेलें आहे. त्यांचा हा लेख महाराष्ट्रीय माणसास आत्मपरीक्षण करावयास लावणारा, व्यापक दृष्टिकोनांतून भारतीय जीवनाचा विचार करणाऱ्या विचारवंतास ' हाच विचार व्यापक दृष्टिकोनांतून कसा करतां येईल ? ' या प्रश्नाचें उत्तर शोधण्यास उद्युक्त करणारा, केवळ भयस्थास बुद्धिविलासाचा आनंद देणारा तर कांही माणसांची चिंतनाची अवस्था सुरूं होण्यापूर्वींच बुद्धिभेद करणारा असा असून अनेक दृष्टींनीं अभ्यसनीय आहे. या लेखाचा अभ्यास करतांना मनांत जे आक्षेप निर्माण झाले ते येथें मांडले आहेत. त्याला कांहीं कारणें आहेत. दाक्षिणात्य लोक आरंभशूर व ' पश्चात् बुद्धि ' असतात असा त्यांच्याविषयीं एक प्रवाद आहे. परंतु अगोदर लिहून ठेवलेल्या रामायणानुसारें आचरण करणाऱ्यांचे आदर्शहि आमच्या डोळयांपुढें असल्यामुळें प्रा. शहा यांनीं मांडलेली स्मृति इकडच्या मंडळींकडून आचरणांत आणली जाण्यापूर्वीं साऱ्याच प्रश्नाचा फेरविचार मानवतेच्या, व्यक्तिस्वातंत्र्याच्या व लोकशाहीच्या हितासाठीं व्हावा म्हणून प्रा. शहांनीं गृहीत धरलेलें ' सर्वनाश समुत्पन्न ' करणारें अरण्यकांड वा युद्धकांड घडण्यापूर्वीं हें उत्तरकांड लिहिणें भाग पडत आहे.

**प्रा. शहांच्या लेखाचा मथितार्थ असा –**

सर्व मराठी भाषिकांचें राज्य निर्माण होणार असें ठरल्याबरोबर नागपूर तें रत्नागिरीपर्यन्तच्या ब्राह्मणवर्गांत आपल्या भवितव्याबद्दल भय निर्माण झालें आहे. मराठ्यांच्या संख्याबाहुल्यामुळें सत्ता त्यांच्या हातांत केन्द्रित होऊन सरकारी नोकऱ्या, समाजजीवनांत अधिकाऱ्याच्या जागा मराठ्यांना अधिक प्रमाणांत मिळत जातील व हळुहळू सर्व क्षेत्रांतून ब्राह्मणांचें उच्चाटण होईल व ब्राह्मण म्हणजे नवीन महाराष्ट्राचे–ज्यू अशी अवस्था निर्माण होईल असें या भीतीचें स्वरूप आहे. या विचारसरणीचा महाराष्ट्रीय जीवनावर अनिष्ट परिणाम होईल. आजपर्यन्त आर्थिक, सांस्कृतिक व प्रशासकीय क्षेत्रांत ब्राह्मणांचें वर्चस्व अबाधित आहे. समानतेच्या तत्त्वावर महाराष्ट्राच्या समाजजीवनाची पुनर्रचना करणाऱ्या सुधारकांना सांस्कृतिक दृष्टया पुढारलेल्या ( जातींनीं नव्हे ! ) म्हणजे ब्राह्मणांनीं कडवा विरोध केला आहे. इतर ब्राह्मणेतर जातींनाहि ही सामाजिक समानता आपल्यापेक्षां कनिष्ठ जातींशीं नको आहे. ही परिस्थिति स्फोटक असून नवीन महाराष्ट्राच्या राजकीय जीवनांत पुढील कांही वर्षे ब्राह्मण विरुद्ध ब्राह्मणेतर असा संघर्ष राहील. त्यामुळें ब्राह्मण नेतृत्वाखालीं मराठेतर समाजाची मराठा विरुद्ध आघाडी निर्माण होणें शक्य आहे. ब्राह्मण



अनुक्रमणिका

समाजांत वर्ण श्रेष्ठत्वाचा दर्प आहे. हा दर्प इतर मराठा समाजांतील पोटजातींतहि असल्यानें मराठ्यांची ब्राह्मणविरोधी आघाडी टिकूं शकणार नाहीं. मराठेतर जमाती जशा ब्राह्मणविरोधी तशा मराठाविरोधीहि होण्याची शक्यता आहे. ब्राह्मण व मराठेतर समाज संयुक्त आघाडी स्थापन करून कम्युनिस्टांना अनुकूल होत आहे व होत राहतील. हें लोकशाहीस मारक आहे. मराठा समाजहि यां धोक्यास कारणीभूत असेल. लोकशाही म्हणजे केवळ बहुमत हें समीकरण चूक आहे. याचे परिणाम अल्पसंख्य सत्तावंचित जातींनाच भोगावे लागतील असें नाहीं ( म्हणजे इतर जातींनाहि भोगावे लागतील हा सूचितार्थ ). मान्य मानवी मूल्यें सर्वसामान्य नागरिकांस अनुभवण्यास मिळण्यासाठीं लोकशाही आहे. परंतु लोकशाही म्हणजे बहुमत असा अर्थ लावून कांही काळ ब्राह्मणद्वेषाला ऊत येण्याचा संभव आहे. असें झालें तर ब्राह्मण जातीला तिनें अनेक शतकें केलेल्या सकाम कर्मयोगाचें फल मिळाल्यासारखें होईल अशी कांही जुन्या मंडळींची प्रतिक्रिया होणें स्वाभाविक आहे. ( म्हणजे तें नैसर्गिक आहे चुकीचें नाहीं हा सूचितार्थ ) परंतु पितरांच्या पापांकरितां ( म्हणजे पितरांनी केवळ पापें केलीं हें गृहीत धरलें ) मुलांना शिक्षा देणें लोकशाही मूल्यांना धरून नाहीं. परंतु या जातीयतेवर मुंबईच्या बहुरंगी आणि सामर्थ्यवान् संस्कृतीचा अंकुश राहील. मुंबई हें महाराष्ट्राचें सांस्कृतिक शक्तिकेन्द्र आहे. व तें महाराष्ट्रीय व गुजराथी समाजाच्या बुरसटलेल्या कल्पना दूर करण्याचें कार्य करील. महाराष्ट्रीय राज्यांत होऊं शकणारी सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे ब्राह्मणांचें उच्चाटण नसून आर्थिक व सांस्कृतिक दृष्ट्या मागासलेल्या जातींना विशेष सवलती देऊन त्यांना पुढारलेल्या जातींच्या बरोबर आणून ठेवण्याचे प्रयत्न ही असेल. या प्रयत्नांचें स्वरूप खालीलप्रमाणें असावें-- मागासलेल्या जातींना दिल्या जाणाऱ्या सवलती लोकशाही मूल्यांशीं सुसंगत असाव्यात. या सवलती दोन प्रकाऱ्च्या १. शैक्षणिक २. प्रशासकीय.

(१) दारिद्र्य आणि भोवतालचें भकांस वातावरण या जन्मजात अडचणींमुळें खेड्यांतील बुद्धिमान् मुलगाहि पुढें येऊं शकत नाहीं. अशा मुलांना शोधून काढून त्यांच्या सर्व उत्तम व उच्चतम शिक्षणाची जबाबदारी राज्यसरकारनें आपल्याकडे घ्यावी.

( २ ) सरकारी नोकऱ्यांवर नेमणूक करतांना त्यासाठीं लागणारे किमान गुण असलेल्या ब्राह्मणेतर जातींच्या उमेदवारांना प्राधान्य द्यावें. तें अनेकदां योग्य ठरेल म्हणजे सरकारी खात्यांत शिक्षकाची जागा भरतांना Ph. D. झालेल्या ब्राह्मणापेक्षां चांगल्या मार्कांनें एम्. ए. झालेल्या ब्राह्मणेतर उमेदवाराची नेमणूक केली तर त्यांत अयोग्य असें कांही नाहीं. वयाची अट सैल करावी. पण गुण व कार्यक्षमता या अटी राज्य-यंत्रणेच्या कार्यक्षमतेसाठीं व तदवलंबी लोकशाहीसाठीं पाळाव्यात.

( ३ ) ग्रामीण विभागांतील ब्राह्मणेतर जातींतील विद्यार्थ्यांना मराठी भाषाप्रभुत्व नसल्यानें बौद्धिक गुण असूनहि परीक्षेंत वर्ग व नंतर व्यवसाय मिळविण्यास अडचण येते. डॉक्टर, इंजिनियर, गणितज्ञ इत्यादींना भाषाप्रभुत्वाची अट त्यांच्या आड येऊं नये.-- या सवलतींमुळें ब्राह्मणवर्गास झळ पोहोचेल पण ती कायमची नसेल. त्यांनीं समंजसपणाची व दूरदर्शी स्वहिताची भूमिका घ्यावी. या सवलती व गुणकर्तृत्वाप्रमाणें मराठेतर कनिष्ठ जमातींनाहि मिळतील याची दक्षता घ्यावी. मराठींतील बहुतेक वृत्तपत्रें [ yellow journalism या सदरांतील ] ब्राह्मणांकडून चालविलीं जातात. त्यांचें अर्वाच्यलेखन असेंच चालूं राहिलें तर ब्राह्मणवर्ग अनेकवर्षें डोकें वर काढूं शकणार नाहीं असा संभव आहे. प्रा. शहांच्या लेखाचा सारांश हा असा आहे. तो जवळ जवळ त्यांचेच शब्द वापरून दिला आहे.



अनुक्रमणिका






ध्वन्वर्थ स्पष्ट करणारे कंस प्रस्तुत लेखकाचे आहेत. या लेखावरील आक्षेप पुढीलप्रमाणें--

### या लेखावरील मुख्य आक्षेप

( १ ) प्रा. शहांनीं केलेला हा विचार सर्वांग परिपूर्ण नाहीं. ( २ ) महाराष्ट्रांतील जातीय संघर्षाचें त्यांनीं चितारलेलें स्वरूप बरोबर वाटलें तरी परिपूर्ण ऐतिहासिक विवेचना खेरीज जातीय संघर्षाला कारणीभूत झालेल्या कारण–घटकांची मीमांसा संपूर्ण होणार नाहीं. ( ३ ) महाराष्ट्राच्या आर्थिक जीवनाचीं सर्व अंगें लक्षांत घेऊन समान वाटपाचा विचार झालेला नाहीं. ( ४ ) ब्राह्मणब्राह्मणेतर या संघर्षांतच ( म्हणजे ५ टक्के विरुद्ध बाकीचे ) साऱ्या महाराष्ट्रीय समाजकारणाची विभागणी करून केलेला विचार संकुचित व अव्याप्त आहे. सारस्वत, सी. के. पी., मारवाडी, गुजराथी, जैन, पारसी, मुसलमान, खिस्ती, सिंधी, मद्रासी अशा सर्व जमातींचा विचार सत्तास्पर्धेतील, आर्थिक स्पर्धेतील व सांस्कृतिक स्पर्धेतील महत्त्वाचे घटक म्हणून व्हावयास हवा, तो झालेला नाहीं. (५) मागासलेल्या जातींना शिक्षणांत व नोकरी मिळविण्यांत सवलती देतांना ब्राह्मणांच्या अगोदर प्राधान्य द्यावें असें सुचवितांना ब्राह्मणांच्या पातळीवरचेच सुशिक्षित, सुसंस्कृत सारस्वत, प्रभु, गुजराथी, बोहरी, खिस्ती, सिंधी आदींचा विचार न करतां केवळ ब्राह्मणांनाच झळ सोसावयास लावणें लोकशाही व व्यक्तिस्वातंत्र्य या दृष्टीनें अन्यायकारक आहे. ( ६ ) शिवाय ब्राह्मण–ब्राह्मणेतर वाद हा केवळ महाराष्ट्रांतच नसून मद्रास, आंध्र, म्हैसूर, केरळ अशा सर्व दक्षिण भारतांत असल्यानें व इतर प्रांतहि वर्णाभिमानाच्या पकडींतून मुक्त नसल्यानें अखिल भारतीय दृष्टीनें हा प्रश्न सोडविण्यास साह्यभूत होईल अशा व्यापक मार्गदर्शनाची अपेक्षा प्रा. शहांच्याकडून होती ती सफल होत नाहीं.

वरील अनेक आक्षेप पुढें ठेवून या लेखाचें परीक्षण येथें करावयाचें आहे. तत्पूर्वी, महाराष्ट्रांतील परिस्थितीचा न्यायनिवाडा करतांना प्रा. शहांनीं स्वीकारलेली दृष्टि संपूर्ण पूर्वग्रहरहित भासते काय हें बघणें इष्ट ठरेल.

### लेखकाची दृष्टि व जमेची बाजू

महाराष्ट्रांत कोणत्याहि जातीचा वरचष्मा असला तरी तिच्या जातीयतेवर दुसरा एक अंकुश मुंबईच्या बहुरंगी आणि सामर्थ्यवान् संस्कृतीचा राहील. 'मुंबई' हें " महाराष्ट्राचें सांस्कृतिक शक्तिकेन्द्र आहे " ( हें वाक्य १९५६ सालीं लिहलें जावयास हवें होतें ! ) असें प्रा. शहा म्हणतात. असें जर आहे तर या सामर्थ्यवान् संस्कृतींतल्या ५७ टक्के अमहाराष्ट्रीय जमातीहि वरील अंकुश धरण्यांत अग्रेसर असतील हा तर्क क्रमप्राप्तच आहे. असें आहे तर महाराष्ट्रांतील जाती–उपजातींची चित्तपावन, शहाण्णव कुळी मराठे, माळी अशी आंकडेवार खानेसुमारी देतांना सामर्थ्यवान संस्कृतींतल्या ५७ टक्के घटकांची आंकडेवार यादी कां दिलीं नाहीं हें कळत नाहीं ! दोन लक्ष चित्तपावनांपेक्षां यांतील अनेक जमातींच्या संख्या अधिक आहेत. 'महाराष्ट्राच्या जातिबद्ध समाजरचनेशीं संलग्न नसलेल्या दृष्टिकोनांतून' विचार अवश्य करावा परंतु मुंबईतील ५७ टक्के जमातींची वर्गवारी त्याहि लोकशाहींतील सन्मान्य मतदार असल्यानें या कोष्टकांत यावयास हवी. या सर्वांचा विचार प्रदीर्घ विवेचनांतून कसा गळूं शकतो हें कळत नाहीं.

न्यायाधिशाच्या भूमिकेंतून विचार करून ब्राह्मणांची बाजू मांडतांना तिच्यावर टीका करण्यापूर्वी तिला स्वग्रहाधिष्ठित टोमण्यांची बाधा होऊं न देणें अवश्य होतें. तसेंच यांत केवळ खर्चाची बाजू मांडून जमेची बाजू अव्यक्त ठेवणें समग्र विचार करण्याच्या भूमिकेस ढळ पोहोचविणारें आहे. ब्राह्मण जमातीचे दोष दाखविण्यास मुळींच हरकत नाहीं. " ब्राह्मण समाज अहंकारी व जातीय वृत्तीचा आहे. त्यानें ब्राह्मणेतरांवर शतकानुशतकें सत्ता गाजविली असे त्याचे दोष असल्यामुळें त्याच्यावर आज

ओढवूं घातलेलें संकट क्रमप्राप्त आहे " असें सरळ न लिहितां व विधानाची जबाबदारी स्वतःवर न घेतां, "ब्राह्मण समाजाचा अहंकार, जातीयवृत्ति, ब्राह्मणेतरावर त्यांनीं शतकानुशतकें गाजविलेलीं सत्ता इ. दोष मान्य करणाऱ्या ब्राह्मण विचारवंतानाहि महाराष्ट्राच्या समाजपुरुषाच्या रोगाचा परिणतिक्रम मान्य आहे " असें लिहून यांतील आरोप करण्याची जबाबदारी अस्तित्वांत नसलेल्या ब्राह्मण विचारवंताच्याच गळयांत बांधून विधानाच्या जबाबदारींतून आपण बाजूस राहावयाचें व परिणतिक्रम मान्य आहे या निर्णयास उचलून धरण्यास हळूंच आपलें बोट पुढें करावयाचें या वक्ररचनेंतूनच तटस्थाच्या भूमिकेला किंचित् ढळ पोहोचतो. 'सर्वनाशे समुत्पन्ने संन्यासाचा सल्ला' 'सकाम कर्मयोगाचें फल' असे टोमणे केवळ मजा बघणारांना हृद्य वाटले तरी तर्कपूर्ण विवेचनास धक्का लावणारे आहेत. शतकानुशतकांचे दोष पदरीं बांधतांना लोकहितवादी, बाळशास्त्री जांभेकर, भाऊ महाजन, विष्णुबुवा ब्रह्मचारी, वासुदेव बळवंत, चिपळूणकर, रानडे, गोखले, टिळक, आगरकर, शिवरामपंत परांजपे, राजवाडे, सावरकर, केतकर, चाफेकर, कान्हेरे, राजगुरू, अण्णा कर्वे, विनोबा भावे अशा अनेकांनीं स्वार्थाचें बलिदान करून या राष्ट्रासाठीं, बहुजनसमाजासाठीं, मानवतेच्या श्रेष्ठ मूल्यांसाठीं जे यातनांचे पर्वत सहन केले त्या त्यागाचा विचार न करतां केवळ दोषदर्शक दृष्टीनें छाननी करणें दिशाभूल करणारें व अन्यायकारक आहे. तसेंच मुसलमानांनीं पांच शतकें, व इंग्रजांनीं दोन शतकें या देशास सर्वस्वानें नागवून प्राणांतिक घोळसलें त्या घनघोर अन्यायाचा विचार न करतां व या पाशवी सत्तांशीं झगडतांना ज्यांनीं बलिदान केलें त्यांच्या त्यागाचा विचार न करतां अन्यायाचें खापर केवळ ब्राह्मण जमातीवर फोडणें हें ऐतिहासिक सत्याला व तज्जन्य परिणाम मीमांसेला डावलणारें आहे. मानवी जीवनाची घडणच अशी आहे कीं या ना त्या स्वरूपाच्या कलहापासून कोठलाहि भूमिभाग कधींच मुक्त नव्हता आणि नसेल. जगाला समता शिकविण्याची पताका हातीं घेऊन पृथ्वीतलावर संचार करणाऱ्या आमच्या खिस्ती बांधवांकडे पाहिलें तर प्रॉटेस्टंट माणूस कॅथॉलिकांच्या चर्चमध्यें पाऊल टाकण्यास आजहि तयार होत नाहीं व निग्रोंना मानवी मूलभूत हक्क देण्यास तयार नाहीं असें दिसतें. याउलट समाजांत व स्वजातींत दोष दिसले तर त्यांच्याशीं प्राणपणानें झुंज देण्यास ब्राह्मण माणूस पुढें आला आहे. पेशवाई संपता-संपतांच लोकहितवादींनीं कठोर आत्मपरीक्षण केलें, बाळशास्त्री जांभेकरांनीं खिस्ती धर्मांत गेलेल्या श्रीपाद शेषाद्रीला सरकार व समाजाचा दोष पत्करून स्वधर्मांत आणलें, विष्णुबुवा ब्रह्मचाऱ्यांनीं खिस्तिधर्मांतरास पायबंद घातला, रानड्यांनीं सहिष्णु व व्यापक उदात्त तत्त्वांवर राजकारण करण्याचा आदर्श निर्माण केला, विष्णुशास्त्रांनीं स्वदेश, स्वधर्म, स्वभाषा याविषयीं अभिमान निर्माण करून मराठ्यांची अस्मिता जागी केली. तेल्या-तांबोळयांचे पुढारी टिळक (ज्यांचें युगपुरुषत्व आतां-आतां व तूर्त तरी मान्य झालें आहे) यांनीं सबंध आशियांत प्रथम लोकशाहीचा पाया घातला, स्वातंत्र्याचा ध्यास निर्माण केला, समता व व्यक्तिस्वातंत्र्य यासाठीं आगरकरांनीं जीवनाचा यज्ञ केला. स्त्रीजातीला गर्तेतून वर काढण्यासाठीं कर्व्यांनीं प्रदीर्घ हयात वेचली, सावरकरांनीं ब्रिटिश सत्तेशीं अखंड झुंज घेऊन स्वातंत्र्यासाठीं दशकानुदशकें यातनामय तुरुंगांत काढलीं, महात्माजींनीं अस्पृश्यतेची चळवळ सुरू केली, तत्पूर्वीच माड्यांनीं या कार्यास प्रारंभ करून वीस वर्षे हें कार्य केलें व याच कार्यार्थ साने गुरुजींनीं पंढरपूरला प्राणांतिक उपोषण केलें. डॉ. केतकरांनीं सबंध समाजरचनाच उलट-सुलट पारखून समाजाला वैचारिक प्रगतीच्या मार्गावर नेऊन ठेवलें. विनोबांचें कार्य डोळयांसमोर आहेच. यांतील अनेक मंडळींनीं

अन्नान्न अवस्थेंत दिवस काढून व्रतस्थ वृत्तीनें समाजकार्य केलें. यांतला एकहि माणूस पुंजीपति नव्हता. याला प्रा. शहा 'सकाम कर्मयोग' म्हणत असतील तर तें सत्यनीतीच्या मूलभूत मूल्यांना अपायकारक आहे. त्यांच्या लेखामुळें एकांगी दर्शन घडून जी **अनुचित भावनात्मक प्रतिक्रिया होण्याचा संभव आहे ती टळावी म्हणून हा प्रपंच केला आहे.** व डावलली गेलेली जमेची बाजू अल्पांशानें दाखविली आहे. इतर जमातींतल्या थोर पुरुषांचें विस्मरण मुळींच झालेलें नाहीं. आतां प्रा. शहांच्या अधिक महत्त्वाच्या मुद्यांचा परामर्श घ्यावयाचा आहे. प्रथमतः ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद कसा निर्माण झाला व निर्माण केला गेला याची पार्श्वभूमि तपासून घ्यावयाची आहे.

## ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादाचे वाटेकरी

भारतांतील वर्णाश्रम व्यवस्थेंतून ब्राह्मण–ब्राह्मणेतर वाद निर्माण झाला. हा वाद या ना त्या स्वरूपांत सर्व भारतभर आहे. इतिहास असें सांगतो कीं, ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तिघांनीं आपापल्या जीविताचे प्रश्न परस्पर संगनमतानें सोडवले. यांत खरा अन्याय शूद्र व प्रतिशूद्र यांवर झाला आहे. ब्राह्मणांनीं विद्येचें क्षेत्र सांभाळलें, क्षत्रियांनीं राज्योपभोग घेतला व वाण्यांनीं व्यापार व अर्थकारण केलें. अशा रीतीनें आपापलें हित साधलें. व पिळवणूक शूद्रातिशूद्रांची झाली. यासाठीं कोठल्याहि एका गटाला जबाबदार धरतां येणार नाहीं. पुढें इंग्रजी राजवटींत याला जें वाईट वळण लागलें त्याचें श्रेय इंग्रजाच्या कलहनिर्मितीच्या धोरणालाहि द्यावें लागेल. तसेंच कांहीं इतर जमातींनाहि अल्पांशानें कां होईना द्यावें लागेल. व्यापार उद्देशानें परप्रांतांत स्थायिक झालेल्या जमाती आपलें आसन स्थिर राखण्यासाठीं अशा कलहांचा फायदा उठवीत असतात. हें व्यापारी धोरणाला व त्या पाठीशीं असलेल्या मानवी स्वभावाला धरूनच आहे. या जमाती चार भूमिकांत आढळणें शक्य आहे. एक म्हणजे दुसऱ्यांच्या घरांतील कलहाकडे संपूर्ण दुर्लक्ष करून आपलें व्यापारी हित साधित राहणें होय. दुसरी भूमिका म्हणजे आपल्या व्यापारी हितावरचें लक्ष न ढळवितां दुसऱ्याची गंमत पाहत राहणें होय. तिसरी भूमिका त्या त्या प्रांतियांशीं समरस होऊन कार्य करणें होय. आणि चौथी भूमिका त्या प्रांतांतील कलहाचा फायदा घेऊन आपलें व्यापारी हित साधणें होय. यांतील तिसरी भूमिका हीच एक आदर्श भूमिका आहे. बाकीच्या तीनहि भूमिका व्यापक राष्ट्रीय दृष्टिकोनांतून अयोग्य आहेत. व्यापारी हित साधणाऱ्या महाराष्ट्रीयेतर जमाती महाराष्ट्राच्या भावनांशीं पूर्णपणें समरस झाल्या असत्या तर या भाषेंत त्यांनीं काव्य-कादंबऱ्यांची, ललितवाङ्मयाची निर्मिति केली असती. मुंबई महाराष्ट्राला देण्याबाबत त्यांनीं पदोपदीं खीळ घातली नसती. मुंबईच्या विधानसभेंत बसून आपापलीं प्रांतराज्यें आपल्याला मिळत असतांनाहि महाराष्ट्राविरुद्ध मतदानासाठीं ते सरसावले नसते. महाराष्ट्रांतील कांही जमाती व्यापारी क्षेत्रांत आपल्याशीं स्पर्धा करीत आहेत. तेव्हां आग भडकल्याचा फायदा घेऊन व्यापारी स्पर्धेचीं मुळें भस्मसात करण्यासाठीं त्यांनीं हातभार लावला नसता. ('नागपूर ते रत्नागिरी पर्यन्तच्या ब्राह्मणवर्गांत आपल्या भवितव्याबद्दल एकप्रकारची भीतीची भावना निर्माण झाली आहे' हें विधान प्रा. शहा जसें निरीक्षणाच्या आधारावर करतात तशाच निरीक्षणाच्या आधारावर वरील विधान केलें आहे.) तसेंच मराठींत वृत्तपत्रें काढून संयुक्त महाराष्ट्राच्या विरुद्ध यांनीं प्रचार केला नसता. त्याचाच अर्थ असा कीं वर सांगितलेली तिसरी आदर्श भूमिका अ–महाराष्ट्रीय व्यापारी जमातींनीं घेतलेली नाहीं म्हणजेच कोणाच्या अध्यांत–मध्यांत न पडण्याचीहि भूमिका त्यांचीं नाहीं हें स्पष्ट होतें. दुसरी भूमिका गंमत पाहण्याची, ती राष्ट्रहित व मानवी मूल्यें

या दृष्टींनीं दोषास्पद आहे. चौथी भूमिका कलह निर्माण करून फायदा करून घेण्याची सर्वच दृष्टीनें गुन्हा ठरावी अशी आहे. म्हणजे वरील दोन भूमिका स्वीकारून या जमाती महाराष्ट्रांत नांदल्या. ब्राह्मणांकडून झालें नसेल असें एवढें महाराष्ट्राचें अर्थशोषण ज्यांनीं पिढ्यान् पिढ्या केलें, कलहाचीं मुळें प्रथमत: आर्थिक विषमतेंत असतात हें ध्यानांत धरतां हें अर्थशोषण सर्वांत अधिक हानिकारक ठरलें आहे. इंग्रजांनीं निर्माण करून पेटवलेला ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद या लोकांनीं फायदेशीर ठरवून घेतला म्हणून हा वाद पेटविणाऱ्या विविध घटकांतील कांही घटक या जमातींच्यां मालकीचे आहेत. सकाम कर्मयोगावर भर देतांना अनेकरंगी व्यापार करणाऱ्या जमातींचा भेदनीतीचा व फायदा घेण्याचा हा मूलोद्योग दृष्टीआड करतां येणार नाहीं. अर्थात् यांतला पहिला क्रमांक व्यापारी इंग्रजांचा व मग राष्ट्रीय वसाहतवाल्या व्यापाऱ्यांचा आहे. म्हणून केवळ ब्राह्मणांना वा केवळ मराठ्यांना दोषी धरतां येणार नाहीं. ह्या व्यापारी शक्तींचें कसब ओळखण्यास व त्यांचा प्रतिकार करण्यांस ब्राह्मण—मराठे आजवर असमर्थ ठरले आहेत. हा मात्र त्यांचा दोष मान्य करावयास हवा.

## आर्थिक समानतेसाठीं धनोत्पादनाच्या — सर्व क्षेत्रांचा विचार हवा

मागासलेले वर्ग पुढे यावेत यासाठीं त्यांना शैक्षणिक व प्रशांसकीय सवलती द्याव्यात असें प्रा. शहांनीं सुचविलें आहे. आर्थिक व सांस्कृतिक समता निर्माण करावयाची असेल तर सर्वांगीण व मूलगामी विचार व्हावयास हवा. रात्रींत इमारत बांधता येईल पण बीचा वृक्ष तयार करतां येणार नाहीं. त्याप्रमाणें मागासलेल्या जमातींची आर्थिक परिस्थिति लवकर सुधारतां येईल परंतु सांस्कृतिक प्रगतीचा मनोविकासाशीं संबंध असल्यानें ती धीरें-धीरेंच होणार. शिवाय सांस्कृतिक उन्नति झाली तरी पोटापाण्याचा प्रश्न नेहमींच दैत्यासारखा पुढें उभा राहणार. महाराष्ट्रांतील मागासलेल्या जमातींना आर्थिक वैभव कसें प्राप्त करून देतां येईल व आर्थिक समानता कशी स्थापन करतां येईल हा मुख्य प्रश्न आहे. प्रथमतः हें करण्यासाठीं धनोत्पादनाचीं जीं जीं क्षेत्रें आहेत त्या सर्व क्षेत्रांचा विचार करावयास हवा. व या प्रांतांत संख्येनें अधिक असलेल्या मराठ्यांना मागासलेल्या जमातींना व अर्थसंपन्न नसलेल्या इतर महाराष्ट्रीयांना त्या धनोत्पादनाच्या क्षेत्रांत वाजवी हिस्सा कसा मिळेल याचा विचार व्हावयास हवा. मोठमोठाल्या गिरण्या, उद्योगधंदे, व्यापाराचीं विविध क्षेत्रें, जमिनी, व शेवटीं नोकऱ्या अशीं हीं धनोत्पादनाचीं क्षेत्रें आहेत. बारकाईनें पाहिलें तर यांत गुंतलेलें ७० टक्क्यांहून अधिक भांडवल मारवाडी, गुजराथी, बनिया, पार्सी, बोहरी, सिंधी व भारतीयेतर यांच्या हातांत एकवटलेलें आहे. ही मंडळी कोट्यवधि रुपयांचा नफा करीत आहेत. साम्यवादी विचारसरणीच्या भाषेंत याला अर्थशोषण म्हणतात. या संपत्तीची समान वाटणी कशी होईल व तिचा वाटा न्याय रीतीनें मिळण्यासाठीं मागासलेल्या जमातींना कसें कर्तबगार करतां येईल याकडे लक्ष द्यावयास हवें म्हणजेच उद्योगधंदे चालविण्याचें शिक्षण या प्रांतांतील लोकांना द्यावयास हवें; त्यांना भांडवल पुरविण्यास हवें, व सहकारी पद्धतीवर धंदे काढून देऊन आर्थिक विषमता नष्ट करून समानता निर्माण करावयास हवी. मागासलेल्या जमातींना चरखे द्यावयाचे व गिरण्यांचीं पोलादी सुदर्शनें आपल्या हातांत ठेवायचीं असें करून हा प्रश्न सुटणार नाहीं. धनोत्पादनाचीं सर्व मोठीं क्षेत्रें लक्षांत घेऊन जातिनिरपेक्ष आर्थिक समानता कशी निर्माण करतां येईल हा पहिला महत्त्वाचा प्रश्न आहे. सरकारी नोकऱ्यांत मागासलेल्या जमातींना गेलीं १३ वर्षे सवलती मिळत आहेतच. तोच मार्ग परत सुचविण्यांत

तथ्य नाहीं. राष्ट्राच्या अर्थकारणाची ती प्रमुख बाब नाहीं. वैयक्तिक किमान प्राप्ति व कमाल प्राप्ति यामध्यें आज दोन ध्रुवांचें अंतर दिसतें. हीच परिस्थिति चालू राहिली तर परिणति—क्रमाच्या तत्त्वानें कम्युनिस्टांचें सामर्थ्य, वाढत राहील व 'सर्वनाशे समुत्पन्ने भांडवलदारो बलिं दद्यात्' । या प्रवृत्तींत त्याची परिणति होईल. मुद्दा असा कीं, महाराष्ट्रांतील आर्थिक जीवनाचीं सर्व अंगें लक्षांत घेऊन प्रा. शहांनीं विचार मांडलेला नाहीं. व उपाययोजना सुचविलेली नाहीं.

### महाराष्ट्राचा विचार करतांना सुधार लेल्या – व्यापारी जमातींकडे दुर्लक्ष कां ?

या पुढचा मुद्दा असा कीं केवळ ब्राह्मण विरुद्ध ब्राह्मणेतर म्हणजे ५ टक्के विरुद्ध उरलेले अशी विभागणी करून साऱ्या महाराष्ट्रीय समाजाचा विचार प्रा. शहानीं केलेला आहे. तो सर्वस्पर्शी ( exhaustive ) वाटत नाहीं. " महाराष्ट्राच्या समाजव्यवस्थेंत परवांपर्यन्त एका अल्पसंख्य जमातीस राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक या सर्व क्षेत्रांत आधिपत्य भोगावयास मिळालें,......आज-सुद्धां आर्थिक, सांस्कृतिक व प्रशासकीय क्षेत्रांत ब्राह्मणांचें वर्चस्व जवळ-जवळ अबाधित आहे " हीं विधानें अर्धसत्य म्हणून अग्राह्य आहेत. महाराष्ट्राच्या अर्थकारणाच्या नाड्या महाराष्ट्रीयेतर भांडवलदारांनीं विशेषतः गुजराथी, मारवाडी, बनिया यांनीं ताब्यांत ठेवलेल्या आहेत. मुंबई सारख्या मोठ्या शहरापासून छोट्या खेड्यापर्यन्त या व्यापाऱ्यांनीं आपली सत्ता प्रस्थापित केली आहे. व्यापाराबरोबरच यांच्या ताब्यांत शेती आहे. शिवाय ते सावकारीहि करतात. याच बरोबर किराणा-भुसार, कटलरी, कापड, औषधें इ. मालाचा, तसेंच चांदी, सोने, जवाहिराचाहि व्यापार करतात. मोठमोठाल्या गिरण्या-उद्योगधंदे चालवितात, आंतरराष्ट्रीय आयात-निर्यात करतात, शेअर मार्केट, बँका चालवितात, अनेकरंगी व्यापार करतात. सरकारी नोकऱ्यांत व प्रशासकीय क्षेत्रांत ही मंडळी किती आहेत हें पाहावयाचें झालें तर नुकताच सचिवालयांतून अहमदाबादेस गेलेला प्रशासकवर्ग व नोकरवर्ग लक्षांत घ्यावा. मुंबईमधील डॉक्टरकीच्या क्षेत्रांत हीच मंडळी प्रमुख आहेत. मोठमोठ्या सॉलिसिटर्स फर्मस् यांच्या आहेत. कोणत्या जमातीकडे किती मोटारगाड्या आहेत, कोणाच्या किती इमारती आहेत, काळ्या बाजारासाठीं शिक्षा झालेले कोणकोण आहेत हेंहि ध्यानांत घ्यावें. हा वर्ग सांस्कृतिक दृष्ट्या सुधारलेला आहे. महाराष्ट्रीय जीवनांतील सर्व क्षेत्रांत वर्चस्व गाजविणारा आहे. व सर्वांत पुढें असलेला हा वर्ग डोळ्याआड करून सर्व क्षेत्रांत ब्राह्मणांचें वर्चस्व अबाधित आहे असें म्हणणें चूक आहे. त्याचप्रमाणें सी. के. पी., सारस्वत, पार्शी, खिस्ति, सिंधी, मुसलमान प्रांतांत लाखांनीं असून पुढारलेल्या जमातींत त्यांचा समावेश करतां येतो. असें असतां एकटा ब्राह्मणवर्ग बाजूला काढून त्यावर रोख धरणें संकुचितपणाचें व अन्यायकारक आहे. खुद्द मराठावर्गांतहि खूप पुढारलेला वर्ग आहे. तोहि यांतून वगळतां येणार नाहीं. म्हणून केवळ ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादावर भर देऊन विचार करतांना मुख्य मुद्दा बाजूला राहतो. तो वाद सोडवला न जातां तीव्र केला जातो. व दुःखाचें खरें मूळ असलेलें अर्थशोषण करणारे घटक बाजूला राहतात. आर्थिक समतेचा प्रश्न सुटला कीं सारे कलह आपोआप मिटतील ( गुजराथमध्यें हा वाद नाहीं याचें कारण आर्थिक सुबत्ता हेंहि असूं शकेल ). म्हणून व्यापारी जातींना— मग तो कोणीहि असो ब्राह्मण असला तरी समंजस भूमिका घ्यावी लागेल.

### व्यक्तिस्वातंत्र्यावर आघात – करणारी उपाययोजना

ब्राह्मणेतरांना प्रशासकीय क्षेत्रांत नोकऱ्या कशा द्याव्यात ह्याविषयीं प्रा. शहांनीं जी रीत सुचविली








आहे ती व्यक्तिस्वातंत्र्याच्या, मानवतेच्या, व व्यापक नीतीच्या तत्त्वास हरताळ फासणारी आहे. या जमातीविषयीं पूर्वग्रहदूषित दृष्टीनें लिहिलें जात आहे कीं काय असा संशय कोणास आला तर तो क्षम्य मानला पाहिजे. प्रा. शहा लिहितात, "सरकारी खात्यांत शिक्षकाची जागा भरतांना पीएच्. डी. झालेल्या ब्राह्मणापेक्षां एम. एची परीक्षा चांगले मार्क मिळवून पास झालेल्या आणि शिक्षक म्हणून आपली जबाबदारी योग्य रीतीनें पार पाडील असें वाटणाऱ्या ब्राह्मणेतर उमेदवाराची नेमणूक केली तर त्यांत अयोग्य असें कांही नाहीं" ( भाषाप्रभुत्व नसलेला प्रा. शहांचा गणिताचा हुशार विद्यार्थी याहि जागेस पात्र ठरवावयाचा काय ? ). प्रा. शहांचें वरील विधान आहे तसें घेतलें तरी भयंकर व व्यक्तिस्वातंत्र्याच्या मूल्यांना मूठमाती देणारें आहे. या शिवाय त्यांत अनेक संशयास्पद जागा सोडल्या आहेत. उत्तम एम्. ए. पीएच्. डी. बहुगुणी उमेदवार व उत्तम एम्. ए बहुगुणी उमेदवार यांत जातिधर्माचा विचार न करतां पहिल्यालाच प्राधान्य द्यावयास हवें हें अमान्य करणें म्हणजे निवडींतील सर्वश्रेष्ठ नीति अमान्य करण्यासारखेंच आहे. पी. एच्. डी. ब्राह्मणापेक्षां एम्. ए ब्राह्मणेतराला प्राधान्य द्यावें असें म्हणतांना ब्राह्मणाइतक्याच पुढारलेल्या एम्. ए., सी. के. पी., एम्. ए सारस्वत, एम्. ए. गुजराथी-पार्शी, ख्रिस्ती या सर्वांना पीएच्. डी. ब्राह्मणापेक्षां वरचें स्थान द्यावें असें जें गृहीत धरलें जातें तेथें या अन्यायावर कळस चढतो व ब्राह्मणाला मुद्दाम बाजूला काढून त्यावर रोख धरला जातो. या धोरणानें लोकशाहीचीं मूल्यें दूषित होतील व लोकशाही वरचा तदवलंबी राज्ययंत्रणेवरचा लोकांचा विश्वास उडेल. कम्युनिस्ट कार्यकर्त्यांना पाय रोवण्यास आदर्श परिस्थिति तें नको असणाऱ्यांकडूनच निर्माण केली जाईल. वरील अनेक कारणांनीं प्रा. शहांनीं दर्शविलेला मार्ग सर्वस्वी त्याज्य आहे. मूळ लेखांतील विचारांवरचे मुख्य आक्षेप येथें संपले आहेत.

**कळकळीची विनंति**

शेवटीं एवढेंच सांगावयाचें कीं महाराष्ट्राच्या पायाभरणीची दिशा व सर्व राष्ट्रोद्धाराची दिशा ही एक व परस्परावलंबी असली पाहिजे. कलह मिटवितांना कलह वाढतील असें कांहीहि होतां उपयोगी नाहीं. यासाठीं जातीयता निरपेक्ष विचार व्हावयास हवा. कोठल्याहि जातीची व्यक्ति असो तिच्या गुणांना व आकांक्षांना वाव मिळेल व त्या विकासाचा उपयोग हें राष्ट्र एकसंध उन्नत करण्यास व परिणामीं मानवतेच्या सुखसमृद्धीस हातभार लावण्यास समर्थ होईल असे यत्न व्हावयास हवेत. त्यासाठीं महाराष्ट्रांतील अर्थकारणांतील विषमता नष्ट केली पाहिजे व तीहि जातिनिरपेक्ष दृष्टींतून. 'नवभारत'च्या त्याच अंकांत तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं नवभारतांतील महाराष्ट्र राज्य या लेखांत म्हटलें आहे कीं "जातीय प्रश्न सोडविण्याचे उपायहि येथें जातीयता वाढविण्यास कारणीभूत होतात" 'हें दुष्टचक्र फोडणारा नवा मार्ग शोधून काढण्याची नवमहाराष्ट्र राज्याची जबाबदारी आहे' तसेंच 'भारताचे प्रश्न विशिष्ट मर्यादेंत सोडविण्याचें प्रयोगक्षेत्र म्हणूनच प्रत्येक प्रांताचा राजकीय दृष्टिकोन असला पाहिजे. भाषिक राज्य हें विभाजक न ठरतां संयोजक ठरलें पाहिजे' हें अचूक व मौलिक मार्गदर्शन डोळ्यापुढें ठेवूनच पुढें जायला हवें.

प्रा. शहांना विनंती अशी कीं वरील टीका त्यांनी एका तर्कपूर्ण व व्यापक दृष्टीनें विचार करूं इच्छिणाऱ्याची प्रामाणिक प्रतिक्रिया म्हणून वाचावी व खेळकर वृत्तीनें घ्यावी. त्यांच्या लेखाच्या प्रभावामुळेंच प्रस्तुत लेखकाच्या मनाचा सुस्तपणा झडून त्यास या लेखानें विचार करण्यास भाग पाडलें, ह्यांतच त्यांच्या लेखाचा मोठेपणा मी मान्य केला आहे.

श्री. रा. वि. अधिकारी

# माणगांव तालुक्यांतील गांवांचीं नांवें : २ :

## गांवांचीं दैवतवाचक नांवें

दैवतवाचक ग्रामनामांचा विचार करतांच प्रथमदर्शनीं एक गोष्ट लक्षांत येते कीं सूर्य या देवतेवरून ठेवलेलीं गांवांचीं नांवें संख्येनें सर्वांत अधिक आहेत. मानवसमाजाच्या प्राथमिक अवस्थेंत सूर्यासारखा दिसता आणि ऊब व प्रकाश देणारा तेजोगोल पूज्य वाटावा यांत नवल तें कोणतें ? या तालुक्यांत सूर्यावरून ठेवलेलीं पांच गांवांचीं नांवें आहेत. भानंग आणि भाणदरे या नांवांत सूर्याचें भानू हें संस्कृत भाषेंतील नांव घेतलेलें दिसतें व त्यांत नूंतील ऊकारलोप पावलेला दिसतो व त्यांना अंग आणि दरे हीं ग्रामत्वदर्शक पदें अनुक्रमानें लागलीं आहेत. दुसऱ्या नांवांत न चा ण झाला आहे. आणि सुरव तर्फ तळें, सुरव तर्फ निजामपूर आणि सुर्लें हीं तीन गांवें सूर्य या शब्दाचें सुर असें रूप होऊन त्यांना व आणि ले हीं ग्रामत्ववाचक पदें लागून तीं सिद्ध झालेलीं आहेत. आणि विशेष म्हणजे हीं तीन गांवें एकमेकांना खेटून वसलेलीं आहेत. अशा सलग प्रदेशांतच सूर्यावरून नांवें देण्याचे काय हेतु असतील कोण जाणे ?

वावे नांवाचीं चार गांवें या तालुक्यांत आहेत. १. वावे तर्फ निजामपूर, २. वावे दिवाळी, ३. वावे मोद्रन आणि ४. वावे हवेली. वावे या शब्दाचा अर्थ काय असावा म्हणून विचार करूं जातां त्याचें दोनतीन प्रकारानें अनुमान करावेसें वाटलें. एक वाव म्हणजे दोन्ही हात पसरून होणारें अंतराचें माप पण तें गांवाचें नांव ठेवण्यास योग्य कारण आहे असें वाटेना. मग दुसरें अनुमान वाव म्हणजे जागा. उदाहरणार्थ : 'मुंबई शहरांत उद्योगी माणसाला आपली उन्नति करून घेण्यास भरपूर वाव आहे' यावरून लोकांना पोट भरण्यास जेथें भरपूर वाव मिळाला तें गांव वावे असावें हा तर्क अधिक योग्य वाटला. पण वाव म्हणजे वारा हा अर्थ ध्यानीं आल्यावर मात्र वायुदेवतेवरूनच हीं गांवांचीं नांवें ठेवलीं गेलीं असावींत असें वाटूं लागलें. कारण येथील प्राचीन राजे ( कोकणांतील ) समुद्रांत चांचेगिरी करीत असत असें कै. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासावरून दिसतें. अर्थात् वाऱ्याच्या अनुकूल प्रतिकूलतेवर अधिक विसंबून राहाणें त्यांना भागच होतें. त्यामुळें त्यांना वायुदेवतेचें महत्त्व वाटून त्यांनीं त्या देवतेच्या नांवानीं आपलें गांव भूषित करावें यांत आश्चर्य तें काय ? आणि यामुळेंच हीं चार गांवें दैवतवाचक ग्रामनामांत समाविष्ट केलीं आहेत. या गांवांच्या नांवांत वाव या शब्दांतील अंत्य अकार एकारांत रूपांतर पावला आहे.

चांढोरे हें गांवाचें नांव चंद्रावरून पडलें आहे हें उघड आहे. कारण चांद या शब्दाचाच चांढ असा अपभ्रंश होऊन त्याला ओरे हें ग्रामत्वदर्शक पद लागून हें नांव तयार झालें आहे. चांढोरे गांवांतील चर्मकार लोक तर गांवाला चांदोरे असेंच म्हणतात व आपलें उपनांव चांदोरकर लावतात. या चांद मधील द चा ढ कसा झाला कोण जाणें ? विहुळे हें दुसरें चंद्रावरून पडलेलें गांवाचें नांव आहे. विधु म्हणजे चंद्र. या विधु शब्दाचेंच विहु असें रूप तयार होऊन त्याला ले हें ग्रामत्ववाचक पद लागून हें नांव बनलें आहे. आणि अशा तऱ्हेनें धुचा हु होणें ही कांहीं अनैसर्गिक गोष्ट नाहीं कारण वधू म्हणजे

मुलगी या शब्दाचें वहू असें रूप झालेलें आपण पाहातोंच. विधाट या नांवाचें गांव मात्र विधि म्हणजे ब्रह्मदेव याच्या नांवावरून की विधु म्हणजे चंद्र याच्या नांवावरून तयार झालें आहे हें सांगतां येत नाहीं. पण या दोहोंपैकी कोठल्या तरी एका दैवताच्या नांवावरून तें बनलें आहे हें नक्की. ब्रह्मा अथवा चंद्र या मोठ्या दैवताचें नांव सांगणारें हें गांव आज मनुष्यवस्ती विरहित असून तेथील शेती आजूबाजूचे गांवकरी करतात.

रुद्रवली हें गांवाचें नांव रुद्र या देवतेच्या नांवाला वली हें ग्रामत्वनिदर्शक पद लागून तयार झालें आहे. तसेंच पुरार हें गांवाचें नांवहि पुरारी या शंकराच्या नांवावरूनच पडलें आहे असें वाटतें. नंदपूर—कोणी नंदापूर म्हणतात—या गांवाचे दोन भाग होऊन नंद याचें नांदवी आणि पूर यांचें पुरार अशीं रूपें झालीं अशी आख्यायिकाहि सांगितली जाते. पण पूर याचें पुरार असें रूप कां व्हावें हें समजत नाहीं. या पुरारगांवीं एक शंकराचें प्राचीन मंदिर होतें आणि तेथें तेथील कोळीराजा नित्य पूजन करीत असे असें सांगतात. अजूनहि त्या स्थानापाशीं जुन्या मूर्ति वगैरे सांपडतात अशी आख्यायिका आहे. यावरून पुरारी महादेवाचें मंदिर आहे तो गांव पुरार हा तर्कच अधिक योग्य वाटतो.

शिवाय इंद्रावरून इंदापूर हें गांवाचें नांव तयार झालेलें दिसतें. इंद्रापूर या मूळ शब्दांतील द्र मधील रकार जाऊन त्याचें रूप इंदापूर झालेलें दिसतें. तसेंच प्रत्यक्ष देव या शब्दावरून झालेलीं तीन गांवांचीं नांवें आहेत. एक देवशेत दुसरें देवळी आणि तिसरें देगांव. देगांव हा देवगांव या नांवाचा अपभ्रंश असावा असें वाटतें पण कदाचित् तो देह-गांव याचाहि अपभ्रंश असेल. या चारी गांवांत पूर, शेत, ळी व गांव हीं ग्रामदर्शक पदें वापरलीं गेलीं आहेत.

खाळजे हें गांवाचें नांव खळनाथ या देवतेवरून पडलें असल्याचें स्पष्ट दिसतें. खळनाथ हें दैवत गोमांतकांतील आहे असें म्हणतात. पण तें या भागांतहि अपरिचित नाहीं. कारण महाड तालुक्यांतील नातें येथील खळनाथाचें देऊळ प्रसिद्धच आहे. बाकी मातीच्या खाळपणाचा या गांवाच्या नांवाशीं कांहीं संबंध दिसत नाहीं. यांत जें हें ग्रामत्वदर्शक पद लागलेलें आहे.

अशीं देवांच्या नांवांवरून गांवाचीं नांवें ठेवलीं गेलीं तशींच देवींच्या नांवावरून ठेवलीं गेलीं कीं नाहीं हा विचार मनांत आला. आणि पाहातांच दिसून आलें कीं देवींच्या नांवाचाहि लाभ ग्रामनामांना झाला आहे. शिरवली तर्फ गोवेले आणि शिरवली तर्फ निजामपूर हीं गांवाचीं नांवें श्री म्हणजे लक्ष्मी या देवतेच्या पुण्यप्रसादानें पावन झालीं आहेत. श्रीचेंच उच्चारसुलभ असें शिर हें रूप होऊन पुढें वली हें ग्रामत्ववाचक पद लागून हें नांव तयार झालें आहे.

हे मोठेमोठे देव जनमनांतील भक्तीनें गांवांच्या नांवाला जोडून लोकांनीं आपल्या स्मृतींत अमर केले. पण इतरहि क्षुद्र देवतांना लोक विसरले नाहींत. दाखणे हें गांवाचें नांव जाख या देवतेच्या नांवावरून ठेवलें गेलें असावें असें वाटतें. जाखमाता, जाखाई वगैरे दैवतें पूर्वापार ग्रामीण विभागांत पूज्य झालेलीं आहेतच. यक्ष या देवतेवरून याख व याखचेंच रूप जाख असें होणें पूर्ण संभवनीय आहे. द्राक्ष या फळाचा या नांवाशी संबंध दिसत नाहीं. कारण कोंकणांत द्राक्षाच्या पिकाचा कोणत्याहि काळांत संबंध आलेलाच नाहीं. दाखण्याचे एक गृहस्थ म्हणत होते की, "तेथील उभारे या घराण्याला सरखोत म्हणून नेमणूक झाल्याचा दाखला मिळाला होता. दाखला या शब्दावरूनच दाखणे झालें." पण हें तर्कसंगत वाटत नाहीं. कारण दाखणे या शब्दांत णे










हें ग्रामत्वबोधक पद आहे, तें कांहीं ला चें अपभ्रष्ट रूप नव्हे हें स्पष्ट दिसत आहे.

भागाड हें गांवहि दैवत बोधकच आहे अशी माझी समजूत आहे. भाग या शब्दाला आड हें ग्रामत्व-बोधक पद लागून हें गांवाचें नांव तयार झालें आहे. भागा हें भाग्य याचेंच रूप आहे हें सहज दिसून येतें. भाग्यनगर, किस्मतनगर वगैरे नांवाच्या धर्ती-वरील हें नांव ठेवून भाग्यदेवतेची स्मृति कोणीतरी चिरंतन करून ठेवलेली दिसते. भाग्य याचें भाग असें रूप नेहमी होतेंच. " आपल्या भागांत असेल तेंच आपल्याला मिळायचें " असें लोक म्हणतांना आढळतात. भाग्याप्रमाणें कालवण हें नांव ठेवून कालदेवतेचीहि आठवण ठेवून कोणीतरी गांवाचें नांव ठेवलेलें दिसतें. यांत वण हें ग्रामवाचक पद लागलेलें आहे.

## पक्षांच्या नांवावरून ठेवलेलीं गांवांचीं नांवें

कांहीं गांवांचीं नांवें पक्षांच्या नांवावरून ठेवलीं आहेत असें दिसून येतें. अशीं आठ गांवें या तालुक्यांत आहेत. कावळा या पक्षाच्या नांवावरून काकल हें गांवाचें नांव तयार झालें आहे. काक या शब्दाला ल हें ग्रामवाचक पद लागून तें नांव तयार झालें आहे. कावळ्याऐवजीं काक हा संस्कृत शब्द येथें वापरला गेला आहे. टिटवी या पक्षाच्या नांवा-वरून टिटवें हें गांवाचें नांव झालें आहे. फक्त अंत्य ई एकारांत रूपांतरींत झाली आहे. टोळ या कीटक-वजा पक्षावरून टोळखुर्द हें गांवाचें नांव तयार झालें आहे. त्याला कोणतेंहि पद लागलें नाहीं. मूळशब्दच जसाच्या तसा कायम राहिला आहे. चाष या शुभ समजल्या जाणाऱ्या पक्षाला इकडील लोकभाषेंत तास असें म्हणतात, त्याच्यावरून पडलेलें तासगांव नांवाचें एक गांव आहे. तास या पक्षीनामाला गांव हें पद लागून तें नांव बनलें आहे. श्येन म्हणजे ससाणा या पक्षाच्या नांवावरून पडलेलीं दोन गांवांचीं नांवें दिसून येतात. एक शेणवली आणि दुसरे शेनाटे. श्येन या शब्दाचें शेण व शेन असें रूप होऊन अनु-क्रमें वली आणि आटे हीं ग्रामत्वदर्शक पदें लागून हीं नांवें बनलीं आहेत. प्रथम मला असें वाटलें होतें कीं हीं गांवें शेण, म्हणजे गुरांची विष्ठा या शब्दावरून बनलेलीं असावींत. पण विचारांतीं तसें नसून श्येन पक्षावरूनच हीं नांवें पडलीं असावींत असा निर्णय घेतला. कारण शेणावरून गांवांचीं नांवें ठेवावींत एवढें शेणखताचें माहात्म्य प्राचीन काळांत वाढलेलें नव्हतें हें खास !

या निरनिराळया पक्षांच्या नांवांवरून गांवांचीं नांवें ठेवलीं. मग मोरासारखा सुंदर आणि या भागांत वैपुल्यानें आढळणाऱ्या पक्षाच्या नांवावरून ठेवलेलें एखाद्या तरी गांवाचें नांव असणारच असें वाटून पाहूं लागलों तों तसें एक गांव आढळलें. तें मोर्बे. मोर या पक्षीनामाला बे हें ग्रामत्वदर्शक पद लागून तें नांव तयार झालें आहे. तसेंच विघवली हें गांवहि विहगवल्ली या शब्दाचाच अपभ्रंश असावा असा माझा समज आहे. कोणत्याहि विशिष्ट पक्षाचें नांव न देतां सामान्य पक्षांचा दर्शक विहग शब्द घेऊन हें झालेलें आहे. शिवाय विळें हें गांवाचें नांव सुद्धा वि म्हणजे पक्षी या शब्दाला ळें हें ग्रामत्व-बोधक पद लागून झालें असण्याचा संभव आहे. कदाचित् तें वेगळयाच कारणानें पडलें असेल असाहि संभव आहे म्हणून त्याचा समावेश पक्षी-वाचक नांवांत न करतां केवळ संभव उल्लेखित केला आहे.

## पशूंच्या नांवांवरून पडलेलीं नांवें

जशीं ही पक्षीबोधक नांवें झालीं तशीं कांहीं पशुवाचक नांवेंहि आढळून येतात. घोडा या प्राण्यावरून पडलेलें घोडेगांव आणि त्या घोडे-गांवचा अपभ्रंश गोरेगांव झालेलें गांव या तालु-क्यांतील एक प्रसिद्ध गांव आहे. टॉलेमी यानें आपल्या ग्रंथांत या गांवचा उल्लेख हिपोकुरा या नांवानें केला आहे. हिपो या ग्रीक शब्दाचा अर्थ

घोडा असाच आहे. म्हणजे प्राचीनकाळीं या गांवाचें नांव घोडेगांव होतें असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. गोरेगांव हें एक बंदर आहे. या बंदरांत अरबस्तानांतील सौदागर घोडे विकावयास आणीत असतील आणि घाट उतरून देशावरील लोक घोडे विकत घ्यावयाला येत असतील हें अगदीं शक्य कोटींतील आहे. असें घोड्यांच्या देवघेवीचें गांव घोडेगांव या नांवानें ओळखलें जाणें स्वाभाविकच आहे. कालांतरानें येथील लोकांच्या बोलण्यांत ड चा र होतो. त्याप्रमाणें घोडेगांवचें घोरेगांव असें रूप होऊन आणखी कांहीं काळानें घोरेगांवांतील महाप्राण लोप पावून गोरेगांव हेंच रूप झालें असणें शक्य नव्हे सहजहि आहे. शिवाय या गांवापासून जवळच घोडेघूम नांवाची एका गांवाची वाडीहि आहे. त्यामुळें यांत शंका घेण्याचें कारणच दिसत नाहीं. गोरेगांव या नांवाशीं काळे-गोरेपणाचा कांहींच संबंध नाहीं हें खास ! माझ्या लहानपणी गोरेगांव हें नांव गौर नांवाच्या देवीवरून पडलें असल्याचें कोणीतरी सांगितल्याचें स्मरतें. पण गौर नांवाची अथवा दुसरी कोठलीच देवी येथें जुन्याकाळांत नव्हती यामुळें तो तर्क निराधार म्हणून सोडून द्यावा लागतो.

गोवेलें हें गांवाचें नांव गो म्हणजे गाय शब्दाला वे आणि ले हीं दोन ग्रामत्व दर्शक पदें लागून तयार झालें आहे. म्हणजे हें गांव गायीचें निदर्शक आहे. गाईवरून पडलेल्या गांवाच्या नांवाशेजारींच वाघावरून पडलेल्या नांवाचें वागांव हें गांव आहे. तें म्हसळें महालांत आहे, त्याचा या तालुक्यांतील नांवांत विचार करतां येत नाहीं. पण वाघावरून नांव पडलेलें दुसरें एक गांव या तालुक्यांत आहे. तें म्हणजे वाघोसे. वांघ या पशुनामापुढें ओसें हें ग्रामत्वदर्शक पद लागून तें तयार झालें आहे.

गाईचा आणि वाघाचा जसा संबंध आहे तसाच वाघ आणि शेळी यांचा आहेच. मग गाय आणि वाघ यांच्या वरून गांवाचें नांव पडलें आहे मग शेळीवरून कां नको ? असें वाटणें साहजिक आहे. पण शेळीवरून पडलेलेंहि एक गांव या तालुक्यांत आहे. तें म्हणजे ढाळशेळी-तेथें कोणी मनुष्य प्राचीन काळांत ढाका खालीं आपली शेळी बांधीत असावा. व नित्य तें दृश्य पाहून त्या गांवाचें ढाकशेळी हें नांव पडलें असेल असें वाटतें. तो मनुष्य आज इतिहासांत विस्मृत झाला आहे पण त्याचें ढाक आणि शेळी मात्र गांवाच्या नांवाच्या रूपानें चिरंजीव होऊन राहिली आहे.

वाघावरून गांवाचें नांव आहे मग त्याच्या मावशीवरून कां नको ? आहे. मांजरावरून तयार झालेलीं दोन गांवांचीं नांवें या तालुक्यांत आहेत. एक मांजुर्णे आणि दुसरें मांजरवणे. एकांत मांजर यांचें मांजुर असें रूप होऊन त्याला णें हें ग्रामत्वबोधक पद लागलें आहे तर दुसऱ्यांत मांजर या शब्दाला वणे हें ग्रामत्ववाचक पद लागून तें नांव तयार झालें आहे. लोकव्यवहारांत मात्र हीं दोन्हीं गांवें मांजुर्णे या एकाच नांवानें ओळखलीं जातात. त्या दृष्टीनें हें ग्रामनामहि पुनरुक्त आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. अशातऱ्हेनें हीं पांच पशूंच्या नांवावरून झालेलीं सहा पशूवाचक ग्रामनामें आहेत.

जशीं या मोठ्या पशूंवरून गांवांचीं नांवें पडलीं आहेत. तशींच सापविंचवांवरूनहि कांहीं ग्रामनामें तयार झालेलीं आहेत. नागांव हें गांवाचें नांव नागगांव याशब्दावरून झालें असल्याचें स्पष्ट दिसतें. तर विंचवली हें गांवाचें नांव विंचू याचें विंच असें रूप होऊन पुढें वली हें ग्रामत्वदर्शक पद लागून झालेलें आहे. गारळ हें नांव त्या गांवांतील जमिनींत गारगोट्या अधिक असल्यामुळें कांहीं पडलेलें नाहीं तर गार म्हणजे घोरपड या शब्दाला ळ हें ग्रामत्वबोधक पद लागून तें बनलें आहे. हा गार म्हणजे घोरपड हा शब्द गोमांतकीय भाषेंतील आहे असें महाराष्ट्र शब्दकोशावरून दिसून येतें. तसेंच हरवंडी हें गांवाचें नांवसुद्धां हर म्हणजे शंकर या देवावरून पडलें नसून

हर म्हणजे अजगर या शब्दाला वंडी हें ग्रामनिदर्शक पद लागून तें नांव तयार झालें आहे हें स्पष्ट दिसतें. कारण या हरवंडी गांवीं शंकराचें देवालय अजिबात नाहीं. हा हर म्हणजे अजगर हा शब्दहि गोमांतकीय भाषेंतील आहे. म्हणजे येथील संस्कृतीवर केव्हांतरी गोमांतकीयांची छाप पडली होती असें यावरून वाटतें.

जशीं पशू, पक्षी, सापविंचू यावरून गांवांचीं नांवें पडलीं आहेत तशींच कांहीं गांवांचीं नांवें मत्स्यांच्या वरूनहि पडलेलीं दिसून येतात. भादाव हें गांवाचें नांव भादा या जातीचा मासा असतो त्याच्या नांवापुढें व हें ग्रामत्वदर्शक पद लागून झालेलें आहे. आणि रिळें हें गांवाचें नांवहि एक रे या जातीचा मासा असतो त्याचें रि असें रूप होऊन त्याला ळे हें ग्रामत्वनिदर्शक पद लागून झालें आहे आणि तें भादाव पासून नजीकहि आहे. रेपोली हें नांव रेप म्हणजे मऊ चिखल यावरून झालेलें म्हणून निसर्गसूचक गांवांत दिलें आहे. पण रेप ही माशाचीहि एक जात आहे. त्यावरूनहि झालें असण्याचा संभव दृष्टीआड करितां येत नाहीं.

## धान्यांच्या नांवांवरून ठेवलेलीं नांवें

जशीं वृक्षांच्या नांवावरून गांवांचीं नांवें पडलीं आहेत त्याप्रमाणेंच या भूमींत पिकणाऱ्या धान्यांच्या नांवांवरूनहि कांहीं गांवाचीं नांवें पडलेलीं आहेत. या भागांत पिकणारें मुख्य धान्य भात म्हणजेच साल आहे. तेव्हां या शब्दावरूनच अधिक ग्रामनामें निर्माण व्हावीं हें स्वाभाविकच आहे. साळे, साळशेत आणि साळवे हीं तीनहि नांवें एकांत अंत्य अकार एकारांत रूपांतरित होऊन तर दुसऱ्यांत शेत हें ग्रामत्वबोधक पद लागून तर तिसऱ्यांत वे हें पद लागून झालेलीं आहेत. त्याच्या खालोखाल चवळीचा क्रम लागतो. चवळीचें रूप चवळ असें होऊन पुढें शेत हें ग्रामत्वदर्शक पद लागून चवळशेत हें गांवाचें नांव झालें आहे. तर आळसुंदा ही चवळीचीच एक जात आहे. तीवरून शेवटचा आकार एकारांत रूपांतरित होऊन आळसुंदे हें गांवाचें नांव तयार झालेलें आहे. नंतर हरक या हलक्या प्रतीच्या धान्यावरून ओल हें पद लागून झालेलें हरकोल, मूग या धान्य नामाला वली हें पद लागून मुगवली आणि तिळ या शब्दांचें तिळ असें रूप होऊन त्याला ओरे हें पद लागून झालेलें तिळोरे हीं गांवाचीं नांवें दिसून येतात.

या भागांत नाचणी हें धान्यहि बरेंच पिकतें. पण त्यावरून पडलेलें गांवाचें नांव मात्र दिसत नाहीं. पण हुरडी हें गांवाचें नांव नाचणीचें धान्य काढून घेतलेलें कणीस हुरडी या नांवानें ओळखलें जातें, त्यावरून पडलें आहे असें वाटतें. अशातऱ्हेनें नऊ गांवांचीं नांवें धान्यबोधक आहेत.

कांहीं गांवांचीं नांवें तर गवतांच्या जातींवरून पडलेलीं आहेत. कुशेडे तर्फ गोवेले आणि कुशेडे तर्फ तळें या गांवाचीं नांवें एकतर कशेड हें एक भाताच्या जातीचें पण बोरू सारखें बळकट पेर असलेलें गवत या भागांत आढळतें त्यावरून पडलें असावें अथवा कुश म्हणजे दर्भ या शब्दाचें कुशे असें रूप होऊन पुढें डे हें ग्रामत्ववाचक पद लागून झालेलें आहे हें खास. मग तें कुश यावरून झालेलें असो अथवा कशेड यावरून झालेलें असो पण तें तृणवाचक आहे हें निर्विवाद. तसेंच बार्पे हें गांवाचें नांव बार नांवाची एक गवताची जात आढळते. बार शब्दाला पे हें ग्रामवाचक पद लागून सिद्ध झालें आहे! अशा तऱ्हेनें तीन गांवें आपलीं नांवें तृणबोधकत्व सांगणारीं आहेत.

## जातीच्या नांवावरून पडलेलीं गांवांचीं नांवें

कांहीं गांवाचीं नांवें जातींच्या नांवावरून पडलेलीं आढळून येतात. आणि अशीं दहा गांवांचीं नांवें आहेत. त्यांत ब्राह्मण जातीवरून पडलेलीं गांवांचीं नांवें सर्वांत अधिक म्हणजे तीन आहेत. बामणघर, बामणसई आणि बामणोली हीं तीं तीन





अनुक्रमणिका

मांगजातीवरून मांगवली हें गांवाचें नांव झालें आहे. आणि भांडीवली हें गांवाचें नांव भांडजातीवरून पडलें आहे असें वाटतें. दोन्ही गांवें वळी या ग्रामत्वदर्शक पदानें झालीं आहेत. पण भांड जातीची वस्ती तर या भागांत मुळींच नाहीं. मग तें नांव कसें पडलें असावें हें समजत नाहीं. पण हा भांडीवली गांव नांदवी गांवाच्या शेजारीं वसलेला आहे आणि नांदवी हें गांव प्राचीन काळीं भरभराटलेलें कोळी राजांच्या राजधानीचें गांव होतें आणि तेथें लोखंडाचे मोठमोठे कारखाने होते असें तेथील जमिनींत सापडणाऱ्या लोहकीटावरून वाटतें. तेव्हां अशा भरभराटलेल्या श्रीमंत आणि सत्ताधीश राजांच्या आश्रयानें भांडांसारखे तमाशाचा धंदा करणारे लोक जवळच राहिले असणें असंभवनीय नाहीं. पुढें हीं राज्यें नामशेष झाल्यावर आश्रय न उरल्यामुळें ते लोक निघून गेले असतील पण त्यांच्यावरून ओळखले जाणारें गांव त्याच नांवानें संबोधिलें जात राहिलें असावें असें वाटतें. कदाचित् असेंहि असूं शकेल कीं नांदवीचे रहिवासी कुंभार मडकी घडवण्यासाठीं पूर्वी भांडीवली येथून माती आणीत असत असें म्हणतात. तेव्हां मडकी म्हणजे भांडीं करण्याला जेथील माती उपयोगी पडते तें गांव भांडीवली या नांवानें ओळखलें जाऊं लागलें असेल.

कुंभार्ते हें गांवाचें नांव कुंभार या जातिवाचक शब्दाला तें हें ग्रामत्वदर्शकपद लागून तयार झालेलें आहे असें दिसतें. तें कुंभे या वृक्षाचें बोधक असण्याचाहि संभव आहे. पण तसें तें असतें तर त्याचें रूप कुंभानें अथवा कुंभाटे झालें असतें पण तसें तें झालेलें नाहीं त्याअर्थी तें कुंभार जातीचेंच निदर्शक आहे असें दिसतें. पण या कुंभार्ते गांवांतहि कुंभाराचें घर नाहीं आणि मांगवलींत मांग लोक राहात नाहींत. पण गांवांचीं नांवें त्या त्या जातींचें तेथील अस्तित्व निदर्शित करीत आहेत हें खास.

नांवें होत. ब्राह्मण शब्दाचें लोकव्यवहारांतील रूढरूप बामण हें होऊन त्याला अनुक्रमें घर, सई आणि ओळी हीं ग्रामत्ववाचक पदें लागून तीं नांवें तयार झालीं आहेत. त्याच्या खालोखाल कोळी आणि न्हावी या जातींवरून प्रत्येकीं दोनदोन गांवांचीं नांवें पडलेलीं दिसून येतात. कोळविरा आणि कोल्हण हीं कोळी जातीवरून झालेलीं ग्रामनामें आहेत. कोळी याचें सामान्य रूप कोळ होऊन त्याला विरा हें ग्रामत्वबोधक पद लागून कोळविरा हें नांव झालें आहे. आणि कोल्हण हें कोल्हा या प्राण्यावरून तयार झालेलें ग्राम नांव आहे असें प्रथमदर्शनीं वाटतें पण कोल्हाण लोकव्यवहारांतील रूढ नांव कोळवण असें आहे यावरून तें कोळी जातीवरूनच तयार झालें आहे हें उघड होतें. कोळवण याचेंच कोल्हाण हें अपभ्रष्ट रूप आहे. कारण या भागांतील सर्वांत जुने रहिवासी आणि या भागाचे राजे कोळीच ( डोंगरकोळी ) होते हें उघड आहे. तेव्हां त्या जातीवरून दोन गांवांचीं नांवें पडलीं असलीं तर त्यांत आश्चर्य नाहीं. न्हावी जातीवरून न्हावे आणि वारक हीं दोन गांवें झालीं असें दिसतें. वारीक या शब्दाचा अर्थ न्हावी असा आहे. सेना न्हाव्याचा प्रसिद्ध अभंग " आम्ही वारीक वारीक । करूं हजामत बारीक ।। " सर्वांनाच ठाऊक आहे. त्यामुळें हीं दोन नांवें न्हावी या जातीचीं बोधक आहेत असें म्हटलें आहे. पण सध्या या दोन्ही गांवीं न्हाव्यांची वस्ती मुळींच नाहीं. पण कांहीं गांवांतून अशा कांहीं जातींची वस्ती पूर्वी असून आतां उठली असल्याचें दिसून येतें. तसाच प्रकार येथेंहि घडून आलेला असणें असंभवनीय नाहीं. शिवाय येथील कुणबी लोकांतहि वारीक आडनांवाचे लोक आहेत. त्यामुळें वारक हा गांव नक्की न्हावीजातीचें निदर्शकत्व करीत आहे असें ठासून म्हणतां येत नाहीं. पण तीच संभवनीयता अधिक दिसते म्हणून त्याचा त्या वर्गांत समावेश केला आहे.








डॉ. प. कृ. गोडे. अनुवादक : श्री. वि. म. बेडेकर

# ताम्बूल, ताम्बूलद्रव्यें आणि ताम्बूलसाहित्य

## — ऐतिहासिक समालोचन

[ डॉ. प. कृ. गोडे यांनीं गेल्या बारा वर्षांत तांबूल, त्याचे घटक, तांबूलसाहित्य इत्यादि तांबूल-संबद्ध विषयांवर निरनिराळया संशोधनपर नियतकालिकांतून अकरा निबंध लिहिले आहेत. ते सर्व सलग एके ठिकाणीं '*Dr. P. K. Gode's Collected Works, Vol. IV : Indian Cultural History, Vol. I*' या ग्रंथांत (पानें ११३–१९०) प्रसिद्ध होत आहेत. या त्यांच्या तांबूलविषयक लेखांच्या आधारें प्रस्तुत सारांशरूप लेख तयार केला आहे. डॉ. गोडे यांनीं प्राच्यविद्यासंशोधनाच्या क्षेत्रांत गेलीं ४३ वर्षें सतत व्यासंग-पूर्वक संशोधन चालविलें असून संस्कृत वाङ्मयेतिहास व सांस्कृतिक इतिहास यांतील अनेकविध विषयांवर ४७५ वर संशोधनपर निबंध लिहिले आहेत. त्यांना येत्या ११ जुलै १९६० रोजीं ७० वें वर्ष लागत आहे. या शुभ निमित्तानें आम्ही त्यांना दीर्घ व कार्यक्षम आयुरारोग्य चिंतितों. — कार्यकारी संपादक. ]

### त्रयोदशगुणी तांबूल

तांबूल, विडा, पान किंवा पट्टी यांची असाधारण लोकप्रियता आजचीच नाहीं. ती शेंकडों वर्षांपासून अबाधित चालत आली आहे. तांबूल हें एक भारतीय संस्कृतीच्या उल्हसित, रंगेल, जीवनानन्द अनुभविणाऱ्या वृत्तीचें एक रंगदार प्रतीक आहे. एका संस्कृत सुभाषितानें म्हटल्याप्रमाणें[1], "त्याच्या ठिकाणीं शेंकडों नव्हे हजारों गुण आहेत. त्याच्या ठिकाणीं एकच दोष आहे. तो हा कीं, विडा किंवा पानसुपारी दिली कीं, पाहुण्यांना निरोप द्यावा लागतो." या उद्गारांतील थोडी अतिशयोक्ति सोडून दिली, तरी तांबुलाच्या ठिकाणीं तेरा गुण आहेत, अशाबद्दल परंपरागत एकवाक्यता आढळून येते. 'योगरत्नाकर' नांवाचा इ. स. १७४६ या काळांतील एक वैद्यकविषयक ग्रंथ आहे, त्यांत तांबुलाचे त्रयोदश गुण दिले आहेत ते असे : "तांबूल हा कटु (तिखटसर), तिक्त (कडवट), उष्ण, मधुर, खारट, तुरट आहे. तो वातहारक, कृमिनाशक, कफहारक असून दुर्गंधि नाहिशी करणारा आहे. तो अशुद्धि नाहिशी करून मुखाला शोभा आणतो आणि कामाग्नि उद्दीपित करतो."

ताम्बूलं कटुतिक्तमुष्णमधुरं क्षारं कषायान्वितं  
वातघ्नं कृमिनाशनं कफहरं दुर्गन्धिनिर्णाशनम् ।  
वक्त्रस्याभरणं विशुद्धिकरणं कामाग्निसंदीपनं  
ताम्बूलस्य सखे त्रयोदशगुणाः स्वर्गेऽपि ते दुर्लभाः ॥

तांबूलाचे हे तेरा गुण वर्णन करणारा असाच श्लोक वरील 'योगरत्नाकरा' पेक्षांहि अनेक जुन्या ग्रंथांतून आला आहे. उदाहरणार्थ, 'धन्वन्तरिनिघण्टु' (हस्तलिखित इ. स. १६८३), हरिदासविरचित 'प्रस्तावरत्नाकर' (हस्तलिखित, इ. स. १५५७), शिवराजकृत 'ज्योतिर्निबंध' (धर्मशास्त्रविषयक ग्रंथ इ.स.१५२४), नरहरिकृत 'राजनिघण्टु' (इ. स. १४५०) हे ग्रंथ पहावेत. यापेक्षांहि जुन्या म्हणजे सुमारें इ. स. १२५८ च्या 'सूक्तिमुक्तावली' या जल्हणरचित ग्रंथांत तांबूलाचे त्रयोदश गुण वर्णन करणारा श्लोक आला आहे. परंतु त्याची तिसरी ओळ वर दिलेल्या श्लोकांतल्यापेक्षां अगदीं निराळी (म्हणजे 'स्त्रीसंभाषणभूषणं रुचिकरं

---

१. 'ताम्बूलस्य गुणाः सन्ति सखे शतसहस्रशः ।  
एकोऽपि च महान्दोषो यस्य दानाद्विसर्जनम् ॥'  
—सुभाषितरत्नाकर (संपादक : कृष्णशास्त्री भाटवडेकर, मुंबई १८७२).










शोकस्य विच्छेदकं' अशी ) असून " स्त्रीसंभाषणाला शोभा आणणारा, रुचकर, आणि शोकनाशक" असे नवीन तीन गुण तांबूलाच्या ठिकाणीं वर्णिले आहेत. कदाचित्, जल्हणाचा ह्या ओळींतला श्लोकपाठ सगळ्यांत जुना असणें शक्य आहे.

पण या सर्वांपेक्षांहि जुना आणि सुरेख असा तांबूलगुणवर्णनपर उल्लेख वराहमिहिराच्या 'बृहत्संहितें' त (इ. स. ५००) आला आहे. या ग्रंथाच्या सुगंधी द्रव्यांचें वर्णन करणाऱ्या 'गंधयुक्ति' नांवाच्या ७७ व्या अध्यायांत तांबूलासंबंधीं तीन श्लोक आले असून त्यांपैकीं एकांत तांबूलाचे पुढील गुण वर्णन केले आहेत : "तांबूल काम उद्दीपित करतो, रूप खुलवितो, सौन्दर्य व प्रेम यांना कारणीभूत होतो, मुख सुगंधित करतो, जोम उत्पन्न करतो आणि कफाचे आजार नाहिंसे करतो. तांबूलाच्या ठिकाणीं हे व दुसरे अनेक गुण आहेत."[२]

## तांबूल आणि शृंगार किंवा प्रणय

तांबूल हा कामोद्दीपक आहे हें वर वराहमिहिराच्या श्लोकांत नमूद आहे. संस्कृत वाङ्मयांत, तांबूलानें प्रणयाच्या, शृंगाराच्या अनेकविध रंगच्छटा खुलविलेल्या आढळून येतात. प्रियेच्या वा प्रियकराच्या मुखांतील तांबूलसेवन हा उत्कट प्रेमाचा एक आविष्कार समजला गेला आहे. प्रियेच्या मुखांतल्या तांबूलसेवनाची मोठी मजेदार उपपत्ति वेंकटनाथ नांवाच्या एका ग्रंथकारानें दिली आहे. तो म्हणतो : " ज्याच्यावर आपली निःसीम भक्ति असते त्यानें खाऊन उरलेलें, त्याचें उच्छिष्ट खाणें ( शेषभुक्ति ) या गोष्टीची उत्कट भक्तीचें लक्षण म्हणून तत्त्वदर्शी मुनी प्रशंसा करतात. म्हणूनच तरुणांना तरुणीच्या मुखांतील तांबूलाची अभिलाषा असते."[३]

वात्स्यायनानें आपल्या 'कामसूत्र' (इ. स. १००) नांवाच्या ग्रंथांतें तांबूलाचें शृंगारविषयक महत्त्व सूचित केलें आहे. " एखाद्या विवाहित परस्त्रीशीं जर प्रणयाराधन करावयाचें असेल तर तिच्या बालकाचें चुंबन घ्यावें, त्याला कवटाळावें आणि आपल्या तोंडांतील विडा आपल्या जिभेनें त्याच्या तोंडांत घालावा" असें त्यानें म्हटलें आहे. तांबूलाच्या शृंगारोपकारकत्वाबाबत वात्स्यायनाचा हा उल्लेख सगळ्यांत जुना ऐतिहासिक उल्लेख समजावयास हरकत नाहीं. आपल्याकडे जुन्या काळीं लग्नसमारंभांत नवपरिणीत दांपत्यानें विड्या तोडण्याचा प्रघात हा तांबूलाच्या शृंगारोपकारकतेचा एक सोज्ज्वळ प्रकार होय.

प्रणयाराधनेंत द्यावयाच्या तांबूलाचे पद्मश्री नांवाच्या ग्रंथकारानें पांच प्रकार नमूद केले आहेत. १. कौशल २. अंकुश ३. कन्दर्प ४. पर्यङ्क ५. चतुरस्रक.[५] तांबूलानें प्रणयांत कसा रंग भरला आहे, हें पुढील आणखी कांहीं उदाहरणांवरून दिसून येईल. दामोदर गुप्त (इ. स. ७५५-७८६) यानें आपल्या 'कुट्टनीमत' नांवाच्या ग्रंथांत काशी येथें वास्तव्य करणाऱ्या मालती नांवाच्या गणिकेचें जीवन वर्णिलें आहे. त्या वर्णनांत त्या गणिकेच्या तोंडीं पुढील उद्गार घातले आहेत :

" त्यानें मला मांडीवर बसवून आपल्या मुखांतला विडा माझ्या मुखांत घातला हा मी एक परम लाभ मानलें. त्यानें मी अगदीं तृप्त झालेंये आहे." [६]

'नैषधीयचरित' कार श्रीहर्ष (१२ वें शतक) यानें, दमयन्तीशीं केलेल्या प्रणयप्रसंगांच्या आठवणी

२. " कामं प्रदीपयति रूपमभिव्यनक्ति सौभाग्यमावहति वक्त्रसुगंधितां च ।
ऊर्जं करोति कफजांश्च निहन्ति रोगान् तांबूलमेवमपरांश्च गुणान् करोति ॥ "

३. " शेषभुक्तिं प्रशंसन्ति मुनयस्तत्त्वदर्शिनः । युवानः खलु वाञ्छन्ति तांबूलं तरुणीमुखात् ॥ "
—हा श्लोक वेंकटनाथानें आपल्या 'सच्चरित्ररक्षा' नांवाच्या ग्रंथांत 'विष्णुतत्त्व' नांवाच्या ग्रंथांतून उद्धृत केला असें म्हटलें आहे.

४. " बालचुम्बनमालिङ्गनं च जिव्हया चास्य ताम्बूलदानम् ॥ "
— कामसूत्र ( निर्णयसागर आवृत्ति 'पारदारिक अधिकरणं' पान २६६).

५. ताम्बूलविटकाः पञ्च कीर्तिता नरपुङ्गवैः । कौशलाङ्कुशकन्दर्पपर्यङ्कचतुरस्रकाः ॥
—नागरसर्वस्व ( संपादक : त्रिपाठी ).

६. लाभः स एव परमः पर्याप्तं तेन तृप्तास्मि । विनिवेश्य यदुत्सङ्गे निक्षिपति मुखे मुखेन ताम्बूलम् ॥
— कुट्टनीमतं ५४९ ( संपादक : श्री. त्रिपाठी. मुंबई, १९२४ ).

काढणाऱ्या नलाच्या तोंडीं पुढील आठवण घातली आहे : " तुझ्या मुखांत माझ्या मुखांतला तांबूल देऊन, नंतर ' माझे तांबूलाचे घास परत देऊन टाक ' अशी परत मागणी केलेली तुला आठवते का ? "[७]

वर उल्लेख केलेल्या ' कुट्टनीमता'चे संपादक श्री. त्रिपाठी यांनीं तांबूलाचा प्रणयरंग वर्णन करणारे कित्येक श्लोक उद्धृत केले आहेत, त्यांपैकीं कांहीं मजेदार आहेत :

" गंधटिळयाविरहित मुख, वेदपठनविरहित जिव्हा, दान न करणारा हस्त, नदीविरहित गांव, जेथें कोणी ज्ञाता नाहीं अशी सभा, घृताविरहित भोजन, स्त्रीविरहित शय्या आणि तांबूलविरहित वदन या सर्वांचा धिक्कार असो ! "[८]

एक प्रेमिक आपल्या प्रियेपाशीं तांबूल मागतांना तांबूलाचें वर्णन करतो :

"तुझ्या नेत्रकटाक्षाप्रमाणें पदपंक्ति उद्दीपित करणारा, तुझ्या कटीप्रमाणें मुठींत मावणारा, तुझ्या कुचकुम्भा-प्रमाणें नखाग्रांच्या खेळास योग्य, तुझ्या हृदयाप्रमाणें उत्कट राग प्रसवणारा, तुझ्या अंगयष्टीप्रमाणें कामो-द्दीपक, आणि तुझ्या ओष्ठाप्रमाणें स्वादिष्ट असा तांबूल, हे तरुणी, आण. "[९]

" प्रातःसमयीं, जेवल्यावर, युवतिसंगमाच्या आधीं व शेवटीं, विद्वत्सभेंत आणि राजसभेंत जो तांबूल सेवन करणार नाहीं तो पशु होय. "[१०]

एक प्रेमिका आपल्या सखीजवळ आपल्या प्रणयाचें वैभव वर्णन करून सांगत आहे :

" अशा पुष्कळ स्त्रिया आहेत कीं, ज्या बिचाऱ्या आपल्या लावण्यलीलांचा अवलंब करून, खूप सेवा करून आपल्या प्रियकराला अनुरक्त करूं पहातात. पण माझी गोष्टच वेगळी ! माझा प्राणेश्वर मला आपल्या उत्तरीयाच्या पदरानें वारा घालीत माझ्या मुखकमलांत विडा भरवतो ! "[११]

## भारतीय शिलालेखांतून तांबूलाचे उल्लेख

### ( इ. स. ४७३ ते १८०० )

वर वात्स्यायनाचें ' कामसूत्र ', वराहमिहिराची ' बृहत्संहिता ' वगैरे वाङ्मयांतून आलेले तांबूलविषयक उल्लेख दिले आहेत. त्यावरून भारतीयांची तांबूल-सेवनाची प्रथा सुमारें दोन हजार वर्षांइतकी जुनी आहे असें आढळून येतें. या वाङ्मयीन उल्लेखांच्या जोडीला शिलालेखांतून किंवा कोरींव लेखांतून तांबूलाचे उल्लेख किती जुने आले आहेत तें पहाणेंहि उद्बोधक ठरेल. शिलालेखविषयक उल्लेखांना ऐतिहासिक महत्त्व अव्वल प्रतीचें असतें. कारण कोरींव लेखांचा काळ बहुधा निश्चित असतो. म्हणून वाङ्मयीन उल्लेखांना जर कोरींव लेखांतील उल्लेखांची जोड देतां आली तर ती ऐतिहासिक कालनिर्णयाला पोलादी चौकटीसारख्या भरभक्कम आधारासारखी होते यांत शंका नाहीं.

---

७. ' जागर्ति तत्र संस्कारः स्वमुखाद्भवदानने । निक्षिप्यायाचिषं यत्ता न्यायात्ताम्बूलफालिकाः ॥
— नैषधीयचरितं २०, ८२.

८. धिक्तांबूलविहीनमाननत्रिलं धिक् पुण्ड्रहीनं मुखं
धिग्वेदोक्तिविवर्जितां च रसनां धिक्पाणिमस्वर्णदम् ।
धिग्ग्रामं च तरङ्गिणीविरहितं धिक्प्राज्ञहीनां सभां
धिग्भुक्तं घृतवर्जितं धिगबलाशून्यां च शय्यामपि ॥

९. " त्वन्नेत्राञ्चलवत्प्रदीपितपदं त्वन्मध्यवन्मुष्टिना
ग्राह्यं त्वत्कुचकुम्भवन्नखमुखव्यापारलीलास्पदम् ।
त्वच्चेतोवदमन्दरागजननं त्वन्मूर्तिवत्कामदं
स्वादिष्टं च तवौष्ठवत् तरुणि मे ताम्बूलमानीयताम् ॥ "

१०. प्रत्युषसि भुक्तसमये युवतीनां चैव सङ्गमे विरमे ।
विद्वद्राजसभायां तांबूलं यो न खादयेत् स पशुः ॥

११. अन्यास्ताः सखि योषितः सहचरं लावण्यलीलाग्रहाः
सेवाभिः प्रचुराभिरुन्मिषदुरुप्रेमाणमातन्वते ।
अस्माकं तु समीरणं वितनुते चेलाञ्चलैरादराद्
वीटीमाननपङ्कजे विसृजति प्राणेश्वरः किं क्रिये ॥ '



अनुक्रमणिका








कोरींव लेखांतून हल्लीं उपलब्ध असलेला तांबूलविषयक सर्वांत जुना उल्लेख इ. स. ४७३ चा आहे. मांदसरच्या रेशीम-विणकरांचा हा कोरींव लेख आहे.[१२] त्यांत त्या विणकऱ्यांनीं तांबूलाच्या उल्लेखाबरोबरच आपल्या रेशमी वाणाची एक उत्तम काव्यमय जाहिरातच जणूं शिलालेखनिविष्ट करून ठेविली आहे! तो उल्लेख ज्या श्लोकांत आला आहे त्याचा आशय असा :

"स्त्रिया तरुण व कितीहि सुंदर असोत! सोन्याचे हार व फुलांच्या माळा घालून, तांबूलसेवन करून त्यांनीं स्वतःला कितीहि भूषविलेलें असो! पण त्यांचें सौंदर्य तोंपर्यंत उत्तम खुलून दिसणार नाहीं, जोंपर्यंत त्यांनीं रेशमी वस्त्रें परिधान केलेलीं नाहींत!"

वरील कोरींव लेख गुप्तकालीन, इ. स. ४७३ चा आहे. कांहीं संशोधकांच्या मतें, गुप्तकालीं भारताचा जावा, सुमात्रा इत्यादि दक्षिणपूर्वेकडील द्वीपांशीं जलमार्गद्वारें संबंध येऊन जें दळणवळण वाढलें, त्यामधून तांबूलाचा, –विड्याचीं पानें व इतर विड्याला लागणाऱ्या जिनसा यांचा भारतांत प्रवेश झाला असावा. या मतास वरील कोरींव लेखानें दुजोरा मिळतो. कालिदासाचे ग्रंथ, चरकसंहिता, काश्यपसंहिता, सुश्रुतसंहिता, बृहत्संहिता- इत्यादि वाङ्मयांतून तांबूलाचे जे उल्लेख मिळतात तेहि या उल्लेखाशीं जमतात.

यानंतर घनिकाच्या नगर येथील कोरीव लेखांत (इ. स. ६८५) तांबूलाचा उल्लेख आला आहे. राजाच्या पराक्रमाचें वर्णन करतांना असें म्हटलें आहे कीं,[१३]

"त्या राजाच्या क्रोधानें शत्रूंच्या सुंदर स्त्रियांचे ओष्ठ **तांबूलरागविरहित** करून टाकले."

यांशिवाय, कर्नाटक, कोल्हापुर व इतर दक्षिण भारतांतील जिल्हे यामध्यें जे कोरीव शिलालेख सांपडले आहेत त्यांवरून इ. स. ७५० ते इ. स. १२३५ पर्यंत विड्याचीं पानें व सुपारी यांचें बरेंच उत्पादन होत असावें असें आढळून येतें.[१४] एका इ. स. ७५०-७७० मधील कोरीव लेखांत 'आडकेय' असा शब्द आला असून त्याचा अर्थ 'areca-nut' संबंधीं म्हणजे 'सुपारीसंबंधीं' असा आहे.[१५] मराठींत रूढ असलेला सुपारी कातरणारा 'अडकित्ता' भाषादृष्ट्या कन्नडोद्भव आहे. याचें पुढें अधिक विवेचन केलें आहे. इतर बऱ्याच कोरींव लेखांतून, सुपारींच्या बागा, विड्याचीं पानें देवालयांकरितां व महाजनांकरितां दान केलीं असें म्हटलें आहे.

तांबूलाला आवश्यक वस्तु म्हणजे सुपारी. तिची लागवड व वापरहि अशा रीतीनें तांबूलाबरोबरच दोन हजार वर्षांपूर्वीपासून चालू असावा असें आढळून येतें. अमरकोश (इ. स. ५०० ते ८००) या ग्रंथांत सुपारीला घोण्टा, पूग, क्रमुक, गुवाक, खपुर असे पर्यायवाचक शब्द दिले आहेत.[१६] बंगालचे राजे भोजवर्मा (इ. स. ११००), लक्ष्मणसेन (इ. स. ११७८–१२०५), विश्वरूपसेन (लक्ष्मणसेनाचा

---

१२. हा उल्लेख मला लंडन येथील इंडिआ ऑफिस लायब्ररीचे लायब्रेरिअन डॉ. एच्. एन्. रँडल (Randle) यांच्याकडून मिळाला. तो श्लोक मूळ असा :—
"तारुण्यकान्त्युपचितोऽपि सुवर्णहारताम्बूलपुष्पविधिना समलंकृतोऽपि।
नारीजनः श्रियमुपैति न तावदग्र्यां यावन्न पट्टमयवस्त्रयुगानि धत्ते॥"
— (फ्लीट 'गुप्त इन्स्क्रिप्शन नं. १८).

१३. "ताम्बूलरागरहिताधरभाञ्जि यस्य कोपश्चकार वदनान्यरिसुन्दरीणाम्। — भारतकौमुदी"
—[Dr. R. K. Mookerji Commemoration Vol. I (1945) अलाहाबाद.] — मधील एस्. एस्. गुलेरी यांचा लेख.

१४. या कोरींव शिलालेखांचे उल्लेख व त्यांतील मजकुराचा निर्देश प्रस्तुत लेखकाच्या Gode Studies Vol. IV 'Studies in Indian Cultural History' Vol. I या लेखसंग्रहांतील पानें ११६–११८ बघावीं.

१५. पहा : 'Historical Grammar of old Kannada' by G. S. Gai, Deccan College Research Institute, Poona, 1946. पान. ११५.

१६. 'घोण्टा तु पूगः क्रमुको गुवाकः खपुरः' — अमरकोश २·१६९ — यावर भानुजी दीक्षितानें



अनुक्रमणिका







मुलगा १२०५-१२१९ ) यांचे जे कोरींव लेख सांपडले आहेत, त्यांतून ' नारळी-पोफळी ( सुपारी ) च्या बागा असलेल्या जमिनी ( ' सगुवाकनारिकेल भूमि', गुवाकवास्तुभू ' ) दान दिल्याचे अनेक उल्लेख आहेत. विड्याच्या पानाला बंगाली भाषेंत ' वरज ' म्हणतात, त्याचाहि या शिलालेखांतून उल्लेख आढळून येतो.[१७]

## तांबूलांतील चुना आणि कात

### ( इ. स. १०० ते १९०० )

चुना आणि कात हे तांबूलाच्या आवश्यक घटकांपैकीं आहेत. त्यांचाहि इतिहास पाहणें उद्बोधक ठरेल. अलीकडच्या काळांतून त्यांचा इतिहास मागें मागें किती नेतां येईल तें पहाण्यासारखें आहे.

शिवाजीमहाराजांनीं रचवून घेतलेल्या राजव्यवहारकोशांत ( इ. स. १६७६ ) रघुनाथपंडितानें ' चुना म्हणजे चूर्ण ' ( ' चूना नाम भवेच्चूर्णम् ' ) आणि चुन्याच्या भांड्याला ' चुनाल ' ( ' चुनालः स्यात् चूर्णपात्रम् ' ) असें म्हटलें आहे. दाते-कर्वे यांच्या मराठी ' शब्दकोशां'त चुनळ, चुनाळ, चुनाळें हे शब्द दिले असून त्यांचें मूळ ' चूर्णालय ' असें सुचविलें आहे. पण या शब्दांच्या उपयोगाचीं वाङ्मयांतील उदाहरणें त्यांनीं दिलेलीं नाहींत.

हिंदचीन (Indo-China) मध्यें तांबूलाची प्रथा दीर्घ काळापासून चालू आहे. हिंदचीनमध्यें उत्तर अन्नम्-प्रान्तांत एका राजघराण्याचें चुन्याचें भांडें किंवा चुनाळें सांपडलें असून तें इ. स. ९६० ते १६४४ या काळांतील असावें असा संशोधकांचा[१८] कयास आहे.

हॉब्सन-जॉब्सन या कोशांतील[१९] ' Chunam ' यावरील लेखांत जे कालक्रमानुसार उल्लेख दिले आहेत त्यांत सगळयांत जुना वार्थेमा- ( Varthema ) चा आहे. तो ( इ. स. १५१० ) म्हणतो : "या विड्याच्या पानाबरोबर एक प्रकारचा ( oyster shells ) मोत्यांच्या शिंपल्यापासून बनवलेला चुना खातात. "

वरील सारखाच मोत्यांच्या शिंपल्यापासून बनविलेल्या चुन्याचा उल्लेख सोमेश्वराच्या ' मानसोल्लास ' ( इ. स. ११३० ) या ग्रंथांतील ' तांबूलभोग ' या प्रकरणीं सांपडतो : " विड्यांत मुक्ताशुक्तीपासून बनविलेला चुना वापरतात. "[२०]

याहिमागें, ज्यांचा काल उपलब्ध आहे अशा उल्लेखांपैकीं चुन्याविषयीं सर्वांत जुना उल्लेख 'बृहत्संहिते'च्या ( इ. स. ५०० ) ' गंधयुक्ति ' या प्रकरणांत एका श्लोकांत आढळून येतो. त्या श्लोकाचा भावार्थ असा : " विड्यांत माफक चुना असेल तर राग ( लाल रंग ) उत्पन्न होतो, जादा सुपारी असेल तर रागाचा नाश होतो, जादा चुना झाला तर तोंडाला वाईट वास येतो, आणि पानें जास्त असतील तर सुगंध येतो. "[२१] विड्याचा लाल रंग यावयास काताची जरूर आहे असें आपण हल्लीं समजतों. वराहमिहिरानें काताचा उल्लेख केलेला नाहीं, हें विशेष आहे.

चरकसंहिता आणि सुश्रुतसंहिता या प्राचीन वैद्यकग्रंथांतून तांबूलाच्या अनेक घटक द्रव्यांचा उल्लेख केला आहे. ' कापूर, जायफळ, जायपत्री, कंकोळ, लवंग, कटुक ( कात ? ), चुना, सुपारी, वेलदोडा यानीं युक्त

---

आपल्या टीकेंत स्पष्ट म्हटलें आहे कीं, " हीं पांच सुपारीचींच नांवें होत : पञ्च पूगवृक्षस्य सोपारी इति ख्यातस्य. । "

१७. याबद्दलचे अधिक तपशीलवार उल्लेख प्रस्तुत लेखकाच्या मूळ लेखांत ' Studies in Indian Cultural History Vol. I, पानें ११९-१२० पहावेत.

१८. " Harvard Journal of Asiatic Studies " ( जून १९४१ ) मध्यें O. R. T. Janse या संशोधकाचा रिपोर्ट दिला आहे तो पहावा.

१९. Hobson-Jobson ( by Yule and Burnell, London, 1903, pp. 218-219).

२०. ' मुक्ताशुक्तिभवं चूर्णं वीटकेषु निधापितम् । '
—' मानसोल्लास ' G. O. Series Baroda, 1939, Vol. II पान ८४.

२१. ' युक्तेन चूर्णेन करोति रागं रागक्षयं पूगफलातिरिक्तम् ।
चूर्णाधिकं वक्त्रविगंधकारि पत्राधिकं साधु करोति गन्धम् ॥ '

"तांबूल शुभ असतो" असें त्यांनीं म्हटलें आहे.[२२] वाग्भटानें आपल्या 'अष्टांगहृदयां'त (इ. स. ८ वें किंवा ९ वें शतक) चुन्याचा व काताचा "द्विपत्रमेकं पूगं च संचूर्णखदिरं तथा" असा वर निर्दिष्ट केलेल्या पंक्तींत उल्लेख केला आहे.

नरहरीच्या 'राजनिघंटू'मध्यें (इ. स. १४५०) अनेक प्रकारच्या झाडांपासून बनविलेल्या चुन्यांचा उल्लेख आढळून येतो.[२३] अर्जुनवृक्षापासून, कुटजापासून, करञ्जापासून, शुक्त्यादींपासून अशीं निरनिराळीं 'चूर्णें' किंवा चुने बनतात व त्यांचे निरनिराळे आरोग्यदृष्ट्या गुणधर्म आहेत असें त्यांत वर्णन केलें आहे. विड्यांत पानें जास्त झालीं तर तांबूल उद्दीपक आणि रंगदार होतो, खैराचा कात जास्ती झाला तर शोष लागतो, आणि चुना जास्ती झाला तर तो त्रासदायक व वाईट वास उत्पन्न करतो, असेंहि 'राजनिघंटू'मध्यें म्हटलें आहे. खदिरझाडापासूनच कात बनवीत असत. खदिर वृक्षाचे वैद्यकीय दृष्ट्या उपयोग प्राचीन कालापासून प्रचलित आहेत, असें चरक, सुश्रुत आदि जुन्या ग्रंथकारांच्या उल्लेखांवरून दिसतें. मूत्राशयविकारांत खदिर आणि क्रमुक (सुपारी) यांचा काढा पाजावा असें सुश्रुतसंहितेंत म्हटलें आहे.[२४] तांबूलांत देखील खदिर (कात) आणि सुपारी दोन्हींहि आहेतच.

चरकसंहितेंत (चिकित्सास्थानं, २६.२०६-२१४) खदिरादिगुटिका आणि खदिरादि तैल यांचा मुखरोगावर इलाज करावा असें म्हटलें आहे. खदिरादिगुटिकाहि चन्दन, लवङ्ग, कक्कोल, जातिकोश (जायफळ), मञ्जिष्ठा, धातकी, एला (वेलदोडा) यांची बनवावी असें म्हटलें आहे. आपल्या हल्लींच्या सुवासिक कातगोळीचें मूळ या चरकाच्या खदिरगुटिकेंत असावें.

सोमेश्वराच्या 'मानसोल्लासां'त तांबूलांत घालावयाच्या कातगोळीचा 'कल्प' आला आहे. राजाला द्यावयाच्या तांबूलांत घालावयाच्या कातगोळींत (खदिरक्काथगुटिकेंत) कस्तूरी, चन्दन (श्रीखण्ड), कापूर यांचें मिश्रण असे, तर काताच्या साध्या भुकटींत (खदिरक्काथचूर्णे) जायफळ, कापूर हे मिसळीत असत.[२५]

खदिर हा वृक्ष ऋग्वेदकाळापासून[२६] पवित्र गणला गेला आहे. यज्ञाला 'खादिर-यूप' विहित होता. कौटिल्यानें आपल्या 'अर्थशास्त्रां'त वनसंपत्तीमध्यें खदिर आणि सोमवल्क यांची गणना केली आहे. सोमवल्क म्हणजे पांढरा खदिर असें म्हणतात.[२७]

सुश्रुतसंहितेमध्यें (चिकित्सास्थानं. ११-१३) खदिरवृक्षाचा स्राव कसा धरावा व बनवावा यासंबंधीं 'विधान' किंवा सूचना केल्या आहेत, त्या पहातां त्या वेळीं औषधी रसायनें कोणत्या पद्धतीनें बनवीत असावेत याची थोडी कल्पना येते: "चांगल्या मोकळ्या जागीं असलेला मध्यम वयाचा खदिर वृक्ष पहावा. त्याच्या मुळाशीं आजूबाजूची जमीन खणावी. नंतर त्याच्या मध्यवर्ती मुळांत एक च्छेद मारावा व त्यांतून बाहेर गळणारा स्राव आंत पडेल अशा बेतानें त्याखालीं अयःकुंभ (पत्र्याचें भांडें) ठेवावा. त्या कुंभाला गोमय आणि माती यांचा लेप देऊन तो कुंभ गोवऱ्या व इतर इंधन पेटवून त्या जाळावर ठेवावा. कुंभांतील स्राव उकळून उतूं जाऊं लागायच्या वेळीं कुंभ उचलावा आणि त्यांतील द्रव निराळ्या भांड्यांत ठेवून तें भांडें नीट सुरक्षित ठिकाणीं ठेवून द्यावें."

तांबूलामध्यें कोणते मसाल्याचे जिन्नस असत यासंबंधीं माहिती 'योगरत्नाकर' (आनन्दाश्रम आवृत्ति, पुणें १९००) या वैद्यकशास्त्रावरील मोठ्या ग्रंथावरून

२२. जातीकटुकपूगानां लवङ्गस्य फलानि च।
कक्कोलस्य फलं पत्रं ताम्बूलस्य शुभं तथा।
तथा कर्पूरनिर्यासः सूक्ष्मैलायाः फलानि च॥
— चरकसंहिता, सूत्रस्थान ५.७७. त्याप्रमाणेंच सुश्रुतसंहिता, चिकित्सास्थान २४.२१ पहावें.

२३. 'राजनिघंटु' (आनन्दाश्रम आवृत्ति. पान. १३२. पुणें १८९६).

२४. 'क्षौद्रमेहिनं कदर (– खदर) – क्रमुककषायं पाययेत्।' — चिकित्सास्थान ११.९.

२५. 'मानसोल्लास' – 'तांबूलभोगः' (उपरिनिर्दिष्ट आवृत्ति पान. ८५).

२६. ऋग्वेद ३.५३.१९ पहा.

२७. पहा: 'अष्टांगहृदयकोश' के. एम्. वैद्य (१९३६), पान ६२५.



अनुक्रमणिका






मिळते. त्यांतल्या माहितीप्रमाणें (श्लोक ५८-५९, पान ३२) तांबूलांतील घटक असे : (१) पूग (सुपारी) (२) कर्पूर (३) कस्तूरी (४) लवंग (५) सुमनस् (जायफळ) (६) ताम्बूलपत्र किंवा पर्ण; हें विड्याचें पान पांडुर किंचित् पांडुरकें पिवळें असावें असें म्हटलें असून पानांत उत्तम पान वंगदेशांतील (बंगाल्यांतील) असाहि निर्देश केला आहे (७) खदिर (कात) (८) चूर्ण (चुना) -याच ग्रंथांत तंबाखूचेहि गुणधर्म दिले आहेत. तंबाखू ही 'दंतरुक्-शमन' आणि कृमिनाशक (कृमिकण्ड्वादि-नाशन) आहे अशी तिची तारीफ केली आहे.

## भारताबाहेरील देशांतून तांबूलाचा प्रचार - (इ. स. ६५० ते १९००)

इंडोचीनमध्यें तांबूलाचा प्रघात फार प्राचीन काळापासून होता. तेथूनच तांबूलाचा शिरकाव दळणवळणामुळें भारतांत झाला, याचा निर्देश मागें आलाच आहे. इंडोचीनमधील लोककथांमध्यें एक लोककथा तांबूलाची उत्पत्ति कशी झाली यासंबंधींची आहे. ह्या लोककथा व्हीटनामी पुस्तकांतून आढळतात त्यांचें फ्रेंचमध्यें भाषांतर झालें आहे.[२८] तांबूलाविषयींची लोककथा थोडक्यांत अशी :

"एक राजा होता. त्याचें नांव क्वान-लांग. त्याला दोन मुलें होतीं. टॅन आणि लँग या नांवाचीं. हे दोघे मुलगे रूपानें इतके सारखे होते कीं त्यांपैकीं मोठा कोण आणि छोटा कोण हें ओळखतां येत नसे. ती मुलें १७।१८ वर्षांचीं असतांना त्यांचे आईबाप वारले. तीं दोघेंहि मुलें एका गुरूकडे धर्म व तत्त्वज्ञान शिकण्याकरितां जाऊन राहिलीं. गुरुजींना एक १७।१८ वर्षांची कन्या होती. तिचें नांव लुन् हुयेन. तिचें या दोन्हीं भावावर प्रेम बसलें. त्यांपैकीं मोठा कोण हें तिला ओळखतां येईना. म्हणून त्यांपैकीं कोणाशी लग्न करायचें हें तिला कळेना. तिनें एक युक्ति योजली. दोघांपुढें तिनें कांजीचा एकच पेला व ती खाण्याकरितां दोनच काड्या आणून ठेवल्या. तिची युक्ति सफल झाली. लहान भावानें मोठ्या भावासमोर पेला ठेवून त्यालाच त्या दोन काड्या दिल्या. मुलीनें मोठ्या भावाशीं लग्न केलें व दोघेंहि लहान भावाला सोडून दूर रहावयास गेलीं. धाकट्या भावाच्या मनाला हें फार लागलें. त्याला वाटलें, भाऊ आपणास विसरला! त्याला दुःख झालें. तो एका खोल ओढ्यापाशीं आला व रडत बसून राहिला. शेवटीं तो तेथेंच गतप्राण झाला. त्याच्या शरीराचें झालें झाड आणि तेंच सुपारीचें झाड होय.

"इकडे धाकट्या भावाचें बऱ्याच दिवसांत दर्शन नाहीं म्हणून वडील भाऊ त्याच्या शोधार्थ निघाला. तो येऊन पोहोंचला त्याच ओढ्याच्या कांठीं, जेथें धाकटा सुपारीचें झाड होऊन बसला होता. तेथेंच तो वडील भाऊहि मरून पडला. त्या झाडालगतच त्याची मोठी शिळा झाली. नंतर ती मुलगीहि आपल्या नवऱ्याचा शोध करीत त्याच ओढ्यावर त्याच ठिकाणीं येऊन पोहोंचली. तिनें त्या शिळेला मिठी मारली आणि धाय मोकलीत मरून पडली. त्या सुपारीच्या झाडाभोंवतीं आणि शिलेभोंवती वेटोळे घालणारी तिची एक वेल झाली. त्या वेलीचीं पानें किती रुचकर आणि किती सुगंधी! हींच ती तांबूलवल्ली आणि त्या तांबूलवल्लीचीं पानें!

"त्या मुलांच्या आप्तेष्टांनीं त्याच्या स्मृतीप्रीत्यर्थ तेथें एक देऊळ बांधलें. येणाराजाणारा तेथें उदबत्त्या लावी व नमस्कार करून जाई. एकदां शरद्-ऋतूंत हुंग नांवाचा एक राजा फिरत फिरत तेथें आला. त्याला त्या झाडाची व नागवेलीची गोष्ट समजली. त्यानें त्या झाडाचें फळ व नागवेलीचीं पानें मुद्दाम आणवलीं. तीं तोंडांत घालून चघळलीं. तों त्याच्या मुखांतून लाल सुगंधी रस बाहेर पडला. राजा खूष झाला. त्यानें आपणांबरोबर तें फळ व पानें नेलीं. व तीं रोपें आपल्या बागेंत लावलीं, एवढेंच नव्हे तर आपल्या सर्वच राज्यांत तीं लावावयाचा हुकूम दिला. आणि शेवटीं असें आज्ञापत्र काढलें कीं, लग्नसमारंभांतून आणि भोजनसमारंभांतून पान-सुपारीचा प्रत्येकानें अहेर द्यावा.!" - ही गोष्ट घडून आली हुंग-व्हुओंगच्या कारकीर्दींत म्हणजे २८८०-२५८ क्रिस्तपूर्व काळांत.

हिंद-चीनमध्यें तांबूलाचा व तांबूलांतील घटकांचा प्रसार किती प्राचीन काळापासून आहे ह्याचें दिग्दर्शन

२८. ही लोककथा व इतर माहिती मला १९४९ सालीं, इंडोचीनमधील प्राच्य संस्थेच्या सेक्रेटरी श्रीमती कार्पेलेस यांच्याकडून मिळाली. तिचें फ्रेंचमधून इंग्रजींत भाषांतर मला डॉ. रा. ग. हर्षे यांनीं करून दिलें.

वर आलेंच आहे. याच निमित्तानें भारताच्या बाहेरील कोणत्या देशांतून तांबूलाचा प्रसार आढळून येतो हें पहाणें उद्‌बोधक ठरेल.

लंका किंवा सिंहलद्वीप या देशांत सुपारीसंबंधी एक विलक्षण लोककथा प्रसृत आहे ती अशी : [२९] " एका ज्योतिष्यानें एकदां एका राजाला सांगितलें कीं, अमुक एका दिवशीं असलेला अमुक एक मुहूर्त इतका मंगल आहे कीं, त्या वेळीं कांहींहि जमीनींत लावलें तर त्याचा एक उपयुक्त वृक्ष होतो. राजानें आज्ञा केली कीं, त्या मुहूर्तावर त्या ज्योतिष्याचें डोकें कापून जमीनींत लावावें आणि चमत्कार असा कीं, त्या जागीं वेडेंवाकडें नारळाचें झाड उगवलें. राजाला यामुळें इतका आनंद झाला कीं त्यानें आपलें स्वतःचेंच डोकें कापवून लाववलें आणि त्याचेंच सरळ सोट सुपारीचें झाड बनलें. "

नेपाळमध्येंहि तांबूलाच्या कथा प्रचलित आहेत. "नेपाळमधील नेवारी लोक मुसलमानांच्या जिवावर उठले होते. भर दरबारांत राजाच्या देखत मुसलमान व इतर परकीय लोक यांना ते ठार मारीत. एकदां त्यांनीं राजदरबारांतल्या मुसलमानाकडे पानाच्या विड्यांत विष घालून पाठविलें. मुसलमानांनीं तें उघडकीस आणून राजाला दाखविलें. राजानें एक बोकड आणवला व त्याला तो विडा खाऊं घातला. बोकड तत्काळ मरून पडला. [३०] "

हिंदुस्थानच्या दक्षिण-पूर्वेकडील सुमात्रा बेटांत सुपारी, पान, विडा यांचा खूपच प्रसार आहे ' सुमात्राचा इतिहास ( History of Sumatra by William Mardsden London, 1784 ) या ग्रंथांतून कांहीं तद्विषयक उतारे येथें अनुवादून दिले आहेत :

" सुपारीच्या झाडाला पेनँग म्हणतात. या झाडांची खूप लागवड करतात. पानवेलीला 'सेरी' ( Seree ) म्हणतात. त्याच्या सुगंधी पानांत सुपारी व इतर पदार्थ घालून खातात. " ( पान ७४ ). "पेनँगचा कोरोमांडल किनाऱ्याशीं व तेलंगणाशीं खूप व्यापार चालतो. " ( पान १२७ ).

" माणसाला स्वस्थ बसवत नाहीं म्हणून म्हणा किंवा कांहीं दुःखद आठवण बुझविण्याकरितां म्हणून म्हणा, कांहीं उत्तेजक वस्तू घ्यावयाचा बहुतेक देशांतील लोकांना छंदच असतो. दक्षिण अमेरिकेंतले लोक कोको आणि मांत्री चघळतात. तर पूर्वेकडील लोक पान सुपारी चघळतात. सुमात्रांतले लोक तर एकजात जेथें जातील तेथें आपल्याबरोबर विड्याचें सगळें साहित्य घेऊन जातात. राजाचें पानदान सोन्याचें असतें, मध्यम स्थितीतल्या माणसांचें चांदीचें तर गरीबांचें पितळेचें किंवा चटईचें बनविलेलें असतें; पानदानें षट्कोनी असून त्यांतून पानें, कापण्याकरितां लहानशी कातर, चुना, चुना लावण्याकरितां लहानशी सळई इत्यादि ठेवण्याची सोय असते. कोणी पाहुणा आला कीं नमस्कार-चमत्कार झाल्यावर यजमान थोडें खालीं वाकून ( पाहुणा आपणापेक्षां मोठा असेल तर ) पाहुण्याच्या दोन्ही हातांत आपले जोडलेले दोन्ही हात घालून ते आपल्या डोक्याला लावतो व त्याला पानसुपारी देतो. ही पानसुपारी न देणें म्हणजे पाहुण्याचा अपमान करणें होय असें समजतात. पानाला चुना लावतात व त्यावर ( कातासारख्या ) गंबीरा ( gambeer ) च्या चकत्या किंवा गोळ्या घालतात. थोडी तंबाखूहि घालतात. अगदीं लहानपणापासून विडा खाण्याचा प्रघात आहे. लहान मुलांचे विड्यानें आरक्त झालेले दांत चमकून दिसतात. पण ते कसल्या तरी पुडीनें काळे करायचा प्रघात आहे. रमजानच्या उपवासांत मात्र मुसलमान विडा, पान खात नाहींत. हा उपवासाचा काळ सोडल्यास, आबालवृद्ध स्त्रीपुरुष विडा मोठ्या शौकानें खात असतात. म्हातारपणांत दांत पडले तरी, विडा बारीक कुटून त्याची गोळी करून खातात. प्रेम वश करून घेण्याकरितां विडे मंतरून देण्याचीहि चाल आहे. विड्यामधून विषप्रयोग होण्याचीहि शक्यता असते. तशी शंका आली असतां पाहुणा यजमानाकडून नुसतें पान घेतो, तें पान आपल्या बोटांनीं साफ पुसून टाकतो आणि आपला चुना त्या पानाला लावतो. " ( पान २४२ )

२९. 'Indian Antiquary' (1904) p. 231 यांत A. A. Parera यांच्या 'Glimpses of Singhalese Social Life' ह्या लेखांतून.

३०. " Account of the Kingdom of Nepal ( Book IV. Ch. II pp. 313-314 ) of the Travel of Ippolito Desideri of Fistoia S. J. (इ. स. १७१२-१७२०).






अनुक्रमणिका





सुप्रसिद्ध प्रवासी बतुत्ता यानें आपलें प्रवासवृत्त (इ. स. १३२५–१३५४) लिहून ठेवलें आहे. त्यांत त्यानें तांबूलाच्या प्रघाताचा उल्लेख केला आहे.[३१]

"अरबस्तानांत येमेनच्या कडेला असलेल्या धोफर या गांवचे रहिवासी पानवेलींचे मळे व नारळीच्या बागा लावतात. या पानवेलींना फळें नसतात. पानांकरितांच त्या लावतात. एखादा पाहुणा घरीं आला असतां, त्याला पांच पानें दिलीं, तर त्याला सर्वस्व मिळाल्याचा आनंद होतो. सोन्याचांदीच्या देणगीपेक्षांहि हा मान मोठा समजतात. पहिल्यांदा सुपारी घेऊन तिचीं बारीक खांडें करून तीं तोंडांत चघळतात. नंतर पान घेऊन त्याला चुना लावतात आणि सुपारीबरोबर तें पान चघळतात. त्यायोगानें तोंडाला व श्वासोच्छ्वासाला एक सुगंध येऊं लागतो, पचनक्रियेला मदत होते, अनशीपोटीं पाणी पिण्यामुळें होणारे दुष्परिणाम टळतात आणि एकंदर सर्वच इन्द्रियशक्ती उत्तेजित होतात." (पान ११४).

"आम्ही अबू बाकर नांवाच्या सुलतानाच्या राजवाड्यांत पोहोंचलों. लगेच आमच्या समोर सुलतानाच्या राजवाड्यांतला कंचुकी (खोजा) पानसुपारीचें तबक आमच्यापुढें घेऊन आला. त्यानें मला १० पानें व थोडया सुपाऱ्या दिल्या." (पान १११).

"मालदीव द्वीपसमूहांतील, महाल द्वीपाच्या सुलताना व तिचा खाविंद यांच्याकडे गेलों असतां, आमचा त्यांनीं पानसुपारी व गुलाबपाणी देऊन संमान केला." (पान. २४६) बतूत्तानें वझीराच्या मुलीशीं लग्न केलें. वझीरानें संमति दर्शक म्हणून त्याच्याकडे पानसुपारी आणि चंदन पाठविलें, असा उल्लेख आहे (पान.२४९).

सुप्रसिद्ध इटालिअन प्रवासी टॅव्हर्निअर हा सुमारें १७ व्या शतकाच्या मध्यकालांत जावा बेटांतच गेला होता. त्यानेंहि तेथील तांबूलाच्या प्रघाताचें वर्णन केलें आहे. तो लिहितो:[३२]

"बांटम (जावाचें पश्चिमेकडील टोंक) चा राजा दरबारांत बसला होता. त्याच्या उजव्या बाजूला एक काळी म्हातारी बाई हातांत खलबत्ता (लहान खल आणि सोन्याचा बत्ता) घेऊन त्यांत पानें, सुपारी व विरघळवलेले मोती घालून विडा कुटीत होती. सगळा कुट्टा एकजीव झाल्यावर, तिनें राजाच्या पाठीवर हात ठेवला. राजानें लगेच आपलें तोंड उघडलें व त्यांत तिनें आपल्या बोटांनीं विड्याची गोळी कोंबली, तान्ह्या मुलांच्या तोंडांत जसें आपलें स्तनाग्र बायका देतात त्याप्रमाणें! राजाच्या तोंडाचें बोळकें झालें होतें. कारण त्यानें इतकी तंबाखू खाल्ली होती कीं त्याचे सगळे दांत पडून गेले होते." (पान ३५४).

दुसरा एक इटालिअन प्रवासी मनुची (१७ व्या शतकाचा मध्यकाल) यानें औरंगजेबाच्या इराणांतील वकीलाविषयीं एक मजेदार उल्लेख केला आहे:[३३] "इराणमध्यें विड्याचीं पानें नव्हतीं. औरंगजेबाच्या वकीलानें अशी तरतूद करून ठेविली होती कीं, तो इराणमध्यें इस्फहानला आल्यावर त्याला लगेच ताजीं विड्याचीं पानें मिळावीं. ह्या पानांचें चर्वण केल्यानंतर तोंडाला आल्हाददायक असा सुवास येत असतो." वर अरबस्तानांत येमेनमध्यें १४ व्या शतकांत तांबूलसेवनाचा प्रघात होता याचा निर्देश बतूत्ताच्या प्रवासवर्णनांतील उताऱ्यांत आला आहे. विड्याचीं पानें १४ व्या शतकांत अरबांना माहीत होतीं पण १७ व्या शतकांत इराणमध्यें प्रचलित नव्हतीं याचें नवल वाटतें.

सुप्रसिद्ध चिनी प्रवासी इत्सिंग (इ. स. ६७१–६९५) यानें मलायाद्वीपकल्पांतील प्रवासाचें वर्णन करितांना सुपारीचा उल्लेख केला आहे. त्यानें म्हटलें आहे:[३४]

"पूर्वेकडे आम्ही प्रवास करीत चाललों असतां, निकोबार बेटावर (the Country of Naked People) आलों. तेथें पूर्वेला कित्येक मैल सुंदर

३१. Travels : Bututta – edited by H. A. R. Gibbs, London 1929.

३२. Travels : Tavernier. (Trans. by V. Ball, 1889. Vol. II).

३३. Storia do Mogor (Mogul India): Manucci. (Trans. by William Irvine, London 1918. 4 Vols).

३४. Travels or a Record of the Buddhist Religion as practised in India and Malay Archipelago: Itsing. (Trans. by Takakusu, Oxford, 1896).









अनुक्रमणिका

नारळी-पोफळींच्या लांबच लांब रायाचे राया पसरलेल्या दिसून आल्या." ( पान xxx )

" बौद्ध भिक्षूंना हात धुतल्यावर साखर-पाणी व सुपाऱ्या भरपूर देतात. पहिल्या उपवसथदिनीं, यजमान एका ताटांत पान घालून त्यावर सुपारी, सुंगधी तेल आणि सालें भरडलेले तांदूळ ठेवतो. " ( पान ४५ )

" भिक्षूंचें भोजन झाल्यावर, त्यांना सुपारी, जायफळ, लवंगा, कापूर देतात. त्यामुळें तोंड सुवासिक होतें, अन्न पचतें आणि कफनाश होतो."

वरील त्रोटक टिपणांवरून हें स्पष्ट होईल कीं, तांबूलसेवनाची प्रथा इ. स. ६५० पासून भारताबाहेर सुमात्रा, जावा, माल्दीव बेटें, निकोबार बेटें, दक्षिण अरबस्तान इत्यादि भागांतून रूढ होती. हा निष्कर्ष डॉ. पां. वा. काणे यांनीं प्रदर्शित केलेल्या मताशीं जुळणारा आहे. तांबूलासंबंधीं डॉ. काणे यांनीं म्हटलें आहे कीं,[३५] "तांबूलाचा बहुधा इसवी सनाच्या थोडा पूर्वी किंवा आरंभकालीं दक्षिण हिंदुस्थानांत शिरकाव झाला असावा. तेथून तो उत्तरेकडे प्रसृत झाला. तांबूलाचा उल्लेख लघुहारीत, लघ्वाश्वलायन, वराहमिहिर, औशनस, रघुवंश ( ६.६४ ), कामसूत्र ( १.४.१६ ) यांच्यामध्यें आढळतो पण प्राचीन गृह्यसूत्रांमध्यें मात्र आढळून येत नाहीं."

डॉ. वासुदेवशरण अग्रवाल ( बनारस विद्यापीठांतील प्राध्यापक ) यांच्या मतें, तांबूलसेवनाची प्रथा बहुधा गुप्तकालाच्या आरंभकालीं अस्तित्वांत आली असावी; त्यावेळीं पूर्वेकडील द्वीपाशीं आपलें सांस्कृतिक दळणवळण वाढून विड्याच्या पानाची आपणांस माहिती झाली.[३६]

## तांबूलाविषयीं धर्मशास्त्रांची दृष्टि

धर्मशास्त्रांच्या मतें, तांबूल हा एक ' भोग ' असून तो साध्या गृहस्थाश्रमी माणसांना विहित आहे पण धार्मिक जीवन व्यतीत करूं इच्छिणाऱ्या व्रतस्थ माणसास तो निषिद्ध आहे.

शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाच्या वेळीं ज्यांनीं पौरोहित्य केलें, त्या गागाभट्टांनीं ( इ. स. १६२०–१६८५ ) आपल्या एका ग्रंथांत[३७] उद्‌धृत केलेला एक श्लोक प्रसिद्ध आहे. त्या श्लोकांत आठ भोग सांगितले आहेत : (१) सुगंध ( सुवासिक द्रव्यें ) (२) स्त्री (३) वस्त्रें (४) संगीत (५) तांबूल (६) भोजन (७) शय्या (८) कुसुम. या आठ भोगांत ' तांबूल ' आहे.

या आठ ' भोगां ' चे उल्लेख व त्यांचें अधिक तपशीलवार वर्णन वर उल्लेख केलेल्यापेक्षांहि जुन्या ग्रंथांतून सांपडतें. चालुक्य राजा सोमेश्वर यानें एक ' मानसोल्लास ' नांवाचा त्या वेळच्या कांहीं भोग्यवस्तूंचें ज्ञान करून देणारा एक ज्ञानकोशासारखा ग्रंथ सुमारें इ. स. ११३० सालीं लिहिला. त्यांतून या अष्ट भोगांचें आलेलें वर्णन प्रस्तुत तांबूलाच्या अनुषंगानें पहाणें उद्‌बोधक होईल :

(१) सुगंधभोग : याचे ' मानसोल्लास ' कारानें दोन प्रकार केले आहेत. (अ) विलेपनभोग[३८] (पान ८५-८७) म्हणजे निरनिराळ्या उटया किंवा उटणीं. सांध्य नांवाचें एक उटणें असून त्यानें घामाचा वास नाहिंसा होतो

३५. ' History of the Dharmaśāstra ' ( B. O. R. I. Poona 1941 ) खंड २. पान. ७३४.

३६. अलीकडील पाश्चात्य संशोधक प्रिझिलुस्की ( Przyluski ) याच्या मतें ' तांबूल ' या शब्दांत मूळ शब्द ' बूल ' आहे. ' बूल ' हा ऑस्ट्रो–एशियाटिक, इंडो–आर्येतर ' बालु ' या शब्दाचा पर्याय आहे. ' बालु ' याचा अर्थ ' गुंडाळलेली, सुरळी केलेली अशी एखादी वस्तु ( Something that is rolled ). ' पहा : ' Empruntz Anaryens en Indo Aryen ' – Przyluski ( Bulletin de la Soc. de Linguistique de Paris, Vol. 24, No. 75. ( 1924 ) pp. 255–258.

३७. ' कायस्थधर्मप्रदीप ' — गागाभट्ट. पान. ३. परिशिष्ट अ, ' राजवाड्यांची गागाभट्टी ' प्रकाशक के. टी. गुप्ते. पुणें १९१९. तो श्लोक असा :—
' सुगंधवनितावस्त्रं गीतताम्बूलभोजनम् । शय्या च कुसुमं चैव भोगाष्टकमुदाहृतम् ॥ '

३८. ' Mānasollāsa, ' Vol. II 1939, G. O. Series, Baroda.

असें म्हटलें आहे. दुसरें एक 'पुल्लिंग' नांवाचें विलेपन आहे. तें हेमंत आणि शिशिर ऋतूंत वापरावयाचें. विलेपनें किंवा उटणीं यांची रंगसंगति अंगावरील पेहरावाशीं साधावी असेंहि त्या ठिकाणीं सुचविलें आहे. (आ) धूपभोग (पानें १४४–१४५): यांतहि चूर्णधूप, पिंडधूप आणि वर्तिधूप असे तीन प्रकार आहेत. हे धूप धुपाटण्यांतून राजापुढें व राण्यांपुढें ठेवावेत, राण्यांच्या साड्या व केस हेहि या धूपासमोर धरावेत असें म्हटलें आहे. धुपाटणीं सोन्याचांदीचीं असत, त्यांना पुष्कळ छिद्रें असत, आणि तीं नाना प्रकारच्या पशुपक्ष्यांच्या आकाराचीं केलेलीं असत, असेंहि वर्णन आढळतें.

२. योषिद्‌भोग किंवा स्त्रीभोग (पानें १४५–१५४): यांत ज्या राण्यांशीं राजानें लग्नें करायचीं, त्यांच्यांत कोणते गुण असावेत हें वर्णिलें आहे.

३. वस्त्रोपभोग (पानें ८८–९०): यांत राजानें कोणत्या ऋतूंत कोणते पोषाख घालावे याचें वर्णन केलें आहे. वसंतऋतूंत सुंदर, झिरझिरीत, पातळ असे रेशमी किंवा साधे कपडे, उन्हाळ्यांत पांढरे कपडे किंवा लोकरीचे पांढरे, मऊ, पातळ कपडे, पावसाळ्यांत लाल, गुलाबी, किंवा तांबडे भडक, शरदृतूंत केशरी रंगाचे, हिंवाळ्यांत लोकरी कपडे अशी विभागणी केली असून, घालावयाचे कपडे स्वतःच्या कातडीच्या रंगाला अनुरूप असावेत असेंहि म्हटलें आहे.

४. संगीतविनोद हा 'मानसोल्लासा'चा तिसरा व शेवटचा भाग असून, सगळ्यांत मोठा आहे.

५. तांबूलभोग (मानसोल्लास व्हॉ. २. पानें ८३–८५): या विभागांत, तांबूलाकरितां लागणाऱ्या सुपाऱ्या वनवासीसारख्या ठिकाणाहून मागवाव्या, सुपारीच्या डोक्याचा वरचा भाग चकतीसारखा कापून काढावा, नंतर ती सुपारी सावलींत सुकत ठेवावी असें वर्णन केलें आहे. खास राजाकरितां जो तांबूल बनवावयाचा, तो ५२ पिवळ्या पानांचा असावा, पानांचीं देंठें व टोंकें खुडलेलीं असावींत, त्यांत पाव सुपारी, मुक्ताशुक्तीचा चुना, ईशावास म्हणजे कापूर,[३९] कस्तूरी इत्यादि सुगंधी द्रव्यें घालावींत, अशा सूचना दिल्या आहेत.

६. शय्याभोग (पा. १४२–१४४): यांत सात प्रकारच्या शय्या आणि आठ प्रकारचे मंचक सांगितले आहेत. तोयशय्या म्हणजे आंत पाणी भरलेली चामड्याची गादी उन्हाळ्याकरितां, हंसजा शय्या म्हणजे हंसाच्या पिसांची बनविलेली शय्या व पुष्पशय्या वसंत ऋतूंत, दोलामंचा म्हणजे कमलतंतूंनी भरलेली झोंपाळ्यावरील शय्या शरदृतूंत, वर्षा, हेमंत, शिशिर या ऋतूंत साधी कापडाची शय्या असे विविध प्रकार वर्णिले आहेत.

७. अन्नभोग (पानें ११५–१३६) यांत ऋतुमानाप्रमाणें शाकाहारी व मांसाहारी पदार्थ व पक्वान्नें व तीं बनविण्याच्या रीती वर्णिल्या आहेत. आपल्या भारतीयांच्या आहारशास्त्रांचा इतिहास लिहावयाचा झाल्यास, त्याकरितां 'मानसोल्लासां'तील या प्रकरणाचें महत्त्व अनन्यसाधारण आहे.

८. माल्योपभोग–कुसुमोपभोग (पानें ९०–९१): यांत राजानें कोणत्या पुष्पांच्या माळा वापराव्या याचा निर्देश केला आहे. चंपक, मल्लिका, उत्पल, पाटल, बकुल, सुरभि, करवीर, शतपत्र, मालती, यूथी, वर्णपुष्प, नेवाली अशीं अनेक फुलांचीं नांवें दिलीं आहेत. यांपैकीं कांहीं फुलांचा प्राचीन भारतांत सुगंधी तेलाच्या कामीं उपयोग होत असे.

'मानसोल्लासां'तील वर दिलेल्या तपशीलवार यादीवरून भारतीय प्राचीन व मध्ययुगीन समाजांतील लोक सुंदर सुंदर वस्तूंचे कसे भोक्ते, व रसिक होते, जीवनांतील सुंदर वस्तूंची त्यांना किती उत्कट आवड होती, याची कल्पना येईल. साहजिकच साध्या संसारी गृहस्थांच्या जीवनांत तांबूलासारख्या एका खुमासदार वस्तूला उपभोग्य भोगांत अपूर्वाईचें स्थान मिळालें, यांत नवल नाहीं.

धार्मिक, व्रतमय जीवन कंठिणाऱ्या यतीसारख्यांना मात्र तांबूल निषिद्ध मानला गेला. पंडितराज जगन्नाथ (इ. स. १६२८–१६५८) यानें अनौचित्याचें उदाहरण म्हणून 'विडा चघळणारा ब्रह्मचारी वा

---

३९. 'मृच्छकटिक' नाटकांतहि (IV) विदूषक म्हणतो :
"दीयते गणिकाकामुकयो सकर्पूरं ताम्बूलम् ।"



अनुक्रमणिका






'यति' हें दिलें आहे.[४०] शिवपुराणांत म्हटलें आहे कीं, सुखशय्या, सुखासन, तांबूल, स्नानानंतर शरीरमण्डन करणें, हीं ब्रह्मचाऱ्याला निषिद्ध होत.[४१] अग्निपुराणांत 'उपवास सारखें पाणी पिण्यानें, तांबूलसेवन करण्यानें मोडतो' असें म्हटलें आहे.[४२] हल्लींदेखील उपवासाच्या दिवशीं सुपारी खात नाहींत.

हरिभास्कर अग्निहोत्री (इ. स. १६७५) यानें आपल्या स्मृतिप्रकाश नांवाच्या धर्मशास्त्रविषयक ग्रंथांत[४३] तांबूलाविषयीं अनेक उल्लेख संगृहीत केले आहेत. त्यानें आश्वलायनाचें म्हणून असें मत दिलें आहे कीं, विद्याभ्यास करूं इच्छिणाऱ्यानें रात्रीं सारखें तांबूल सेवन करूं नये, तांबूलाच्या अतिसेवनानें, पांडुरोग, दंतरोग, डोळ्यांचे रोग, मुखरोग, बलक्षय इ. उद्भवतात. त्यानेंच वसिष्ठांचेंहि मत दिलें आहे, त्याप्रमाणें, "तांबूलाचें किंवा तांबूलसंबद्ध कोणत्याहि (सुपारी, पान) पदार्थाचें यति, ब्रह्मचारी, विधवा, रजस्वला यांनीं सेवन करणें मांसाशनाइतकें किंवा सुरापानाइतकें निषिद्ध होय."

ज्याला श्राद्धकर्म करावयाचें आहे त्यानें तांबूल-सेवन, दंतधावन या गोष्टी करूं नयेत असें इतिहासोपनिषदांत म्हटलें आहे.[४४] हेमाद्रीनें (इ. स. १२६०) जाबालीचें वचन म्हणून जें दिलें आहे तेंहि वरील इतिहासोपनिषदांतल्या सारखेंच आहे. मृत आप्ताच्या स्मरणाप्रीत्यर्थ एक वर्षपर्यंत पान किंवा सुपारी खायचें वर्ज्य करण्याचें व्रत घेणें अजूनहि प्रचलित आहे. वेथेंमा नांवाच्या प्रवाश्यानें (१५०२-१५०८) आपल्या प्रवासवृत्तांत असें नमूद करून ठेवलें आहे कीं, त्यावेळच्या कालिकतच्या राजानें आपल्या मृत आप्ताच्या स्मरणाप्रीत्यर्थ एक वर्षपर्यंत स्त्रीशय्या आणि सुपारी वर्ज्य केली होती.

अर्थात् याहि तांबूलवर्ज्यावर्ज्यप्रकरणीं शास्त्रकारांत मतभेद दिसून येतात. उदाहरणार्थ, 'शिवसंहिता' या योगविषयक तांत्रिक ग्रंथांत, योग्यानेंहि तांबूलसेवन करावें परंतु त्या तांबूलांत चुना नसावा, असा उल्लेख आहे. चुन्याशिवाय तांबूल हा योग्याला निषिद्ध नाहीं. 'शिवसंहितें'त (पान ३२, तिसरी आवृत्ति, पाणिनि ऑफिस अलहाबाद १९४२) म्हटलें आहे: "योग्यानें तूप, दूध, मिष्टान्न, चुन्याशिवाय तांबूल, कापूर, सालें काढलेलें गोड धान्य यांचें सेवन करावें व ल्हान दार असलेल्या मठांत रहावें." नारायणतीर्थानें आपल्या 'योगसिद्धांतचंद्रिका' या व्याख्येमध्यें (चौखांबा सीरिज, बनारस, १९१०, पान १००) "कापूर, गोड गाईचें दूध, चुन्याशिवाय तांबूल ही योग्याला शुभ व बलप्रद आहेत" असें म्हटलें आहे.

एका धर्मशास्त्रकाराचें मत असें आढळून येतें कीं, (नेहमीचें) नित्य श्राद्ध, अमाश्राद्ध (अमावास्येच्या दिवशीचें श्राद्ध), आणि कृष्णपक्षांतलें श्राद्ध हीं करणारानें तांबूलचर्वण करण्यास हरकत नाहीं.[४५]

'स्मृत्यर्थसार' (आनंदाश्रम-संस्कृतग्रंथमाला, नं. ७० इ. स. १९१२) या धर्मशास्त्रविषयक ग्रंथाचा लेखक श्रीधर यानें तर म्हटलें आहे कीं, पितृयज्ञांतील स्नानदानादिक क्रिया तांबूलसेवन करूनहि कराव्यात.[४६]

---

४०. "शूद्रस्य निगमाध्ययनं, ब्रह्मचारिणो यतेश्च ताम्बूलचर्वणम् । -- दारोपसंग्रहः ।" 'रसगङ्गाधरः' (निर्णयसागर आवृत्ति) पान. ५१.

४१. पहा: 'प्रशस्तिसंग्रह' — के. भुजबलशास्त्री (Jain Antiquary Vol. VI, No. 2, June 1940).

४२. "असकृज्जलपानाच्च तांबूलस्य च भक्षणात् । उपवासः प्रदुष्येत दिवास्वप्नाच्च मैथुनात् ॥" – 'अग्निपुराण' (वेंकटेश्वर प्रेस आवृत्ति, मुंबई) अध्याय १७५.

४३. हस्तलिखित नं. १६१. विश्राम. I भांडारकर प्राच्यविद्यामंदिर, पुणें.

४४. 'दंतधावनताम्बूलं क्षौराभ्यञ्जनभोजनम् । स्त्र्यौषधं परान्नं च श्राद्धकर्ता विवर्जयेत् ॥' – साधले यांचा उपनिषद्वाक्यकोश खंड १ (१९४०), पान २९०

४५. "नित्यश्राद्धे त्वमाश्राद्धे श्राद्धे चापरपक्षिके । ताम्बूलचर्वणे दोषो नेति शातातपोऽब्रवीत् ॥" हा श्लोक लक्ष्मणभट्टांच्या (इ. स. १५८०-१६४०) 'आचाररत्नाकर' या (भांडारकर प्राच्य-विद्यामंदिरांतील हस्तलिखित) ग्रंथांत उद्धृत केला आहे.

४६. इक्षूनपः फलं मूलं ताम्बूलं पय औषधम् । भक्षयित्वापि कर्तव्याः स्नानदानादिकाः क्रियाः ॥ (पान.४८).



अनुक्रमणिका







'पितरांना द्यावयाच्या पिण्डांना अक्षता, गन्ध, पुष्प, धूप, दीप, वस्त्र, तांबूल द्यावा' असेंहि श्रीधरानें म्हटलें आहे.

### तांबूलाविषयीं कांहीं समजुती

आपण हल्ली लग्न-मौंज समारंभांतून व इतर धार्मिक विधींतून विड्याचीं दोन पानें व त्यावर सबंध सुपारी किंवा कातरलेली थोडी सुपारी अशी देत असतों. पण शिवदास नांवाच्या एका ग्रंथकारानें ज्योतिर्निबंध (इ. स. १५२४) नांवाच्या एका धर्मशास्त्रविषयक ग्रंथांत तांबूलाविषयीं अनेक समजुती दिल्या आहेत त्या मजेदार आहेत: "ज्या वदनांत वेदपठन नाहीं, तांबूल-रस नाहीं आणि सुभाषितें नाहींत तें तोंड नसून नुसतें बिळ होय. तांबूल म्हणजे ब्रह्मा, विष्णु, शिव या त्रिमूर्तीचें रूप आहे: सुपारी ब्रह्मदेवाला, पानें विष्णूला आणि चुना शिवाला आवडतो. एका सुपारीचा तांबूल उत्तम, दोन सुपाऱ्यांचा निष्फळ आणि तीन सुपाऱ्यांचा उत्कृष्ट. बत्तीस पानांचा विडा द्यावा मोठ्या राजाला, चोवीस पानांचा द्यावा मांडलिक राजाला, अठरा पानांचा द्यावा जांवयाला, बारा पानांचा द्यावा विद्वान् पंडिताला आणि दहा पानांचा[४७] द्यावा नवपरिणीत वधूला. बाकी इतर सर्वांना आठ पानांचा, तर अगदीं सामान्य माणसांना चार पानांचा विडा द्यावा. शत्रूला सहा पानांचा विडा द्यावा. सुपारीच्या दानांत, एक सुपारीचें दान फायद्याचें ठरतें, दोन सुपाऱ्यांच्या दानानें अनिष्ट होतें, तीन सुपारींच्या दानानें सुख मिळतें, चारांनीं दुःख, पांचांनीं दीर्घायुष्य प्राप्त होतें आणि सहांनीं मृत्यु ओढवतो. – विड्याच्या पानाचें देंठ रोगकारक असतें, तर पानाचें टोंक अशुभ असतें. सुरकुतलेलें पान खाल्ल्यानें मृत्यु येतो. पानाच्या शिरा खाल्ल्यानें बुद्धिनाश ओढवतो. पानाला अंग-ठ्यानें चुना लावला तर धन व दीर्घायुष्य लाभतें, वस्त्रलाभ व स्त्रीलाभ होतो. कात घालून विडा खाणें दिवसां चांगलें, रात्रीं वाईट; रात्रीं कात घालून विडा खाल्यास इन्द्र देखील आपल्या पदावरून भ्रष्ट होईल. तांबूलांत, सकाळीं सुपारी जास्त असावी, मध्यान्हीं चुना जास्ती असावा आणि रात्रीं पानें जास्ती असावींत, तर तें शुभदायक असतें. शहाण्या माणसानें तांबूल खातांना त्यांत तीन हिस्से सुपारी, दोन हिस्से पानें, आणि एक हिस्सा कात घालावा."

बत्तीस पानांच्या विड्याचा उल्लेख एका मराठी लोकगीतांत आला आहे:[४८]

"सोळा सहस्र नारी कृष्ण घालितो धिंगाणा ।
बत्तीस पानांचा विडा मुखांत रंगणा ॥"

सुप्रसिद्ध वैद्यकग्रंथ 'अष्टाङ्गहृदय' — त्याचा कर्ता वाग्भट (इ. स. ६२५ किंवा ६८०) यानें तांबूल-सेवन केव्हां, किती करावें याबद्दल सूचना दिल्या आहेत. तो म्हणतो: "निजून उठल्यावर, भोजनोत्तर, स्नानोत्तर, ओकारीनंतर, तांबूलसेवन करणें हितकर असतें. विडा दोन पानांचा असावा, त्यांत एक सुपारी, चुना, कात असावा."[४९]

तांबूलाचा उपयोग सन्मानाप्रीत्यर्थ किंवा मंगल-सूचकहि होत असे. उदाहरणार्थ, इ. स. १४१६ च्या एका पर्शियन भाषेंतील फर्मानांत एका मुसलमान सुभेदारानें तांबूलाबाबत पुढील हुकूम[५०] दिले आहेत: "(१) राजगुरु पुरुषोत्तमराव कावळे पैठणकर नांवाच्या ब्राह्मणाला प्रत्येक गांवांतून दर वर्षी १६ पानें व ५ सुपाऱ्यांचा विडा मिळावा. (२) मुलाचा व मुलीचा विवाहनिश्चय करावयाचा असेल तर त्याकरितां या ब्राह्मणाकडे ५० पानें व १० सुपाऱ्या यांचा विडा वाजतगाजत पाठवून त्याला निमंत्रण द्यावें."

४७. दुसरा बाजीराव पेशवा याच्या 'डायरी'त (संपादक: लाड १९०८, पान ४३ वर) गणपति –वेंकटेश यांच्या देवळांतील उत्सवांतील भोजनसमारंभांतील जिन्नसांची यादी दिलेली आहे, त्यांत दहापानी विड्याबद्दलचा उल्लेख (१८०७–१८०८) आहे: "कुलपी विडा-दहा पिकलेल्या पानांचा, त्यांत चुना, दोन लवंगा, दोन वेलदोडे, दोन कातगोळ्या आणि सुपारी."

४८. 'जानपद ओवी' हा लेख — लेखिका अनसूया भागवत. (महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका, पुणें, जुलै १९४१).

४९. 'सूत्रस्थान' ३·३७–३८ (संपादक: किंजवडेकर, पुणें १९४०).

५०. 'शुक्ल यजुर्वेदीय ब्राह्मणांचा इतिहास' — एन्. व्ही. वैद्य पुरंदरे, मुंबई १८८४ यांतील परिशिष्ट 'ऊ' बघावें.










**अडकित्ता ( इ. स. १३०० ते १८०० )**

तांबूलसाहित्यामध्यें अडकित्त्याला एक अत्यंत महत्त्वाचें व उपयुक्त स्थान आहे, याची प्रचीति आपणांस विविध प्रकारची कारागिरी केलेले जे अडकित्त्याचे अनेक प्रकार आढळून येतात त्यांवरून येऊं शकेल. पुण्याचे एक पुराणवस्तुसंग्रहकार श्री. केळकर यांनीं अनेक प्रकारचे अडकित्ते जमविले आहेत. त्यांतला एक अडकित्ता 'मिथुन' या नांवाचा आहे. त्याची एक बाजू पुरुषाकृति आहे आणि दुसरी बाजू स्त्री- आकृति आहे. सुपारी कातरायला हा अडकित्ता घेतला तर प्रत्येक वेळेला हें स्त्रीपुरुषमिथुन परस्परास आलिंगन देत असतें. रंगेल तांबूलाचा जो सहचर अडकित्ता त्याला अनुरक्त मिथुनाचें रूप देणाऱ्या कारागिराची रसिकता तांबूलाला साजेशीच आहे यांत शंका नाहीं.

तांबूलाइतकीच सुपारी दोन हजार वर्षांइतकीच प्राचीन आहे. पण सुपारी फोडावयाला लागणारा जो अडकित्ता त्याला तितका प्राचीन शब्द अजून तरी आढळून आला नाहीं. अडकित्ता हा शब्द अडकोत्तु या कानडी शब्दापासून मराठींत आला आहे.[५१] शिवकालीं अडकित्ता हा शब्द प्रचलित होता असें रघुनाथपंडिताच्या ( इ. स. १६७६ ) 'राजव्यवहारकोशा'वरून दिसतें. त्यांतले तांबूलसाहित्यविषयक श्लोक असे :

पट्टी स्यादल्पतांबूलः सैव बर्ग इतीर्यते ॥
तंबूलदानपर्यायः करङ्कः परिकीर्तितः ।
चुनालः स्याच्चूर्णपात्रं पूगस्फोटी तथाडकित्ता ॥
चूना नाम भवेच्चूर्णं दस्ता स्यात् पर्णवेष्टनम् ।
— भोग्यवर्ग ६५-६६.

यापेक्षांहि जुना असा अडकित्त्याचा उल्लेख भीमकवीच्या 'बसवपुराण' या ( इ. स. १३६९ ) कन्नड ग्रंथांत 'अडकोत्तु' आणि 'अडकेगत्ति' असा आला आहे. अडकी = areca nut अरेका नट = सुपारी आणि ओत्तु = दाबणें किंवा फोडणें.— या 'अडकोत्तु' पासूनच मराठी 'अडकित्ता' आला आहे. कन्नडमध्यें अडकित्त्याला दुसरा शब्द अडकेगत्ति म्हणजे अडके = सुपारी आणि गत्ति = कत्ति = चाकू किंवा सुरी अशा अर्थाचा आहे.[५२] यावरून, 'अडकित्ता' हा शब्द सहाशें-सातशें वर्षांइतका जुना आहे, हें स्पष्ट दिसतें.

गुजरातेंत लहान अडकित्त्याला 'सूडी' आणि मोठ्या अडकित्त्याला 'सूडो' म्हणतात.[५३] बंगालमध्यें अडकित्त्याला 'यांति' ( 'यन्त्र' ) म्हणतात. हिंदीमध्यें अडकित्त्याला 'सरौता' असें म्हणतात. आसाममध्यें कोरडी सुपारी कापायच्या अडकित्त्याला 'चरोता' म्हणतात. आसाममध्यें हिरवी आणि पिकलेली सुपारी वापरतात. ती चाकूनेंच कापतात. म्हणून तेथें अडकित्त्याचा उपयोग सार्वत्रिक नाहीं.[५४]

महानुभावांच्या 'लीळाचरित्र' या मराठी ग्रंथाच्या ( इ. स. १२५० ) उत्तरार्धांत अडकित्त्याला '**पोफळफोडणा**' हा शुद्ध मराठी शब्द वापरला आहे.[५५] संस्कृतांतला जसा 'पूगस्फोटी' हा शब्द तसा मराठींतला 'पोफळफोडणा' हा शुद्ध मराठी शब्द तेराव्या शतकांत प्रचलित असलेला पुढें कसा लुप्त झाला व त्याऐवजीं कन्नड शब्द 'अडकित्ता' कसा आला हें एक गूढच आहे.

वा. शि. आपटे यांनीं आपल्या 'इंग्लिश-संस्कृत' कोशांत 'nutcracker' ( अडकित्ता ) ला 'संदशक' हा शब्द दिला आहे. पण त्यांनींच त्यांच्या संस्कृत-इंग्रजी कोशांत 'संदशका' चा अर्थ 'a pair of tongs' म्हणजे 'सांडशी' असा दिला आहे. आणि तोच बरोबर वाटतो. 'संदशक' अडकित्ता या अर्थी कुठेंहि मला सांपडलेला नाहीं.

पतंजलीच्या 'व्याकरणमहाभाष्यां'त 'शङ्कुलया खंडः शङ्कुलाखंडः' असा उल्लेख आहे. डॉ. वासुदेव शरण अग्रवाल यांच्या मतें 'शङ्कुला' याचा अर्थ 'अडकित्ता' असा आहे. पंडितमंडळी 'महाभाष्यांती'ल या वाक्याचा अर्थ सांगतांना 'अडकित्ता' असाच अर्थ सांगतात अशी दीर्घकालीन परंपरा आहे. 'सिद्धान्त-

५१. दाते आणि कर्वे यांचा 'शब्दकोश' पहा.
५२. ही माहिती बेळगांवचे श्री. एम्. पी. वाली एम्. ए. यांनीं मला कळविली.
५३. दिवाणबहादुर के. एम्. झवेरी एम्. ए. एलएल्. बी. ( मुंबई ) यांनीं ही माहिती कळविली.
५४. आसाममधील के. के. हण्डिकी एम्. ए., जोऱ्हट कॉलेजचे प्रिन्सिपॉल, यांनीं ही माहिती कळविली.
५५. ओस्मानिया विद्यापीठाचे प्रा. सुसारी यांनीं या शब्दाकडे माझें लक्ष वेधलें.

कौमुदी'वरील 'विद्याविलास' या व्याख्येचा कर्ता शिवराम ( इ. स. १७००–१७५० ) यानें 'शङ्कुला' शब्दाचा अर्थ 'क्रमुकादिभेदसाधनं' म्हणजे 'अडकित्ता' असाच दिला आहे. त्यावरून पंडिती परंपरेच्या अर्थास दुजोराच मिळतो, हें खरें. पण महाभाष्यकार पतञ्जलीच्या काळीं ( इ. स. पूर्व १५० ) सुपारी प्रचलित होती कीं नाहीं हें वादग्रस्तच आहे.

हिंदचीनमध्यें सुपारी व तांबूल यांचा प्रचार फार जुन्या काळापासून आहे याचा निर्देश वर आलाच आहे. तेथें अडकित्याला खालील शब्द सांपडतात.

(१) लाओस भागांत— 'मित् सानक'

(२) व्हीटनाम ,, — 'दाओ दाऊ'

(३) कँब्रोडिआ ,, — 'प्रानक'

## पिकदाणी

रंगदार तांबूलाच्या रंगीत पिकांनीं किंवा 'पिचकाऱ्यांनीं' रस्ते, इमारतीचे ओटे, भिंती रंगून कशा घाण होतात हें विदितच आहे. म्हणूनच १७ व्या शतकांतील एक ग्रंथकार वरदराज, ( भट्टोजी दीक्षिताचा शिष्य ) यानें 'गीर्वाणपदमञ्जरी' या आपल्या ग्रंथांत " रस्त्यावर तांबूलभक्षण हा दुराचार होय. " ( 'सर्वेषां देशे पथि तांबूलभक्षणं दुराचारः' ) असें स्पष्ट म्हटलें आहे. तांबूलाच्या या उपद्रवाविरुद्ध घरगुती इलाज म्हणून पिकदाण्या अस्तित्वांत आल्या असाव्या.

पिकदाणीला, पिंकदानी, पिकदान, पिकधरणी, पिकपात्र असे पर्याय सांपडतांत.[५६] १७ व्या शतकाच्या पूर्वार्धांतील वाङ्मयांत यांचा उपयोग सांपडतो. उदाहरणार्थ, हरिविजयांत ( ३४, १५८ ) '**पिकदानें** ऊर्ध्वमुखें। तांबूलपत्रें अतिसुरेखें', तुकारामाच्या गाथेंत ( १७४६ ) 'तांबुलाची **पिकधरणी**। ते मी असे मुख पसरुनी ॥' आणि मुक्तेश्वराच्या 'आदिपर्वा'त ( ४८·१७ ) 'मृदुमवाळ बोटिंगणें। **पिकपात्रें** झळकती ॥' असे उल्लेख सांपडतात.

शिवकालीन 'राजव्यवहारकोशां'त ( इ. स. १६७६ ) "पिकदाणी म्हणजे संस्कृत पतद्–ग्रह आणि तस्त म्हणजे गण्डूषपात्र ( चुळा टाकायचें भांडें )" असें म्हटलें आहे. इ. स. १५४४ पूर्वी रचिलेल्या 'पारसीभाषानुशासन' नांवाच्या कोशांत तस्ताला 'तस्तरी' असें म्हटलें असून 'हात धुण्याचें पात्र' हस्तप्रक्षालक असें वर्णन केलें आहे.

'अमरकोशांत ( इ. स. ५०० ते ८०० ) पिकदाणीला दोन शब्द दिले आहेत : 'प्रतिग्राहः पतद्ग्रहः।' ( २·१३९ ). यावर व्याख्या करतांना भानुजी दीक्षित ( इ. स. १६३० ) यानें म्हटलें आहे : "पततः ( ताम्बूलादेः ) ग्रहः। द्वे पीकदानी इति ख्यातायाः।" भानुजी दीक्षितानें 'पीकदान' असाहि पर्याय दिला आहे. बर्निअर या प्रवाश्यानें, मेण्यांत बसून जाणारे राजे व उमराव मखमली तक्यावर टेंकून विडे खात असत आणि मेण्याच्या जवळ पिकदाणी घेऊन नोकर कसे उभे असत याचें वर्णन केलें आहे.

सर्वानन्द नांवाच्या एका व्याख्याकारानें ( इ. स. ११५९ ) 'अमरकोशां'तील 'पतद्ग्रह' या शब्दाचा " तांबूलाचा दूषित रस घेणारें ( पीकदान )– दूषितरसं ताम्बूलं पतद् गृह्णाति इति पतद्ग्रहः। " असा अर्थ दिला आहे.[५७]

आपल्याकडे परवांपरवांपर्यंत जावयाला लग्नाप्रीत्यर्थ देणगी म्हणून द्यावयाच्या वस्तूंत पिकदाणी देत असत. ही चाल 'नैषधीयचरित'कार श्रीहर्ष ( इ. स. ११७५ ) याच्या काळींहि होती असें 'नैषधीयचरिता'वरून ( १६·२७–२८ ) आढळतें. त्यांत म्हटलें आहे कीं :

" भीम राजानें नलाला एक 'पतद्ग्रह' ( पिकदाणी ) दिला. हा पतद्ग्रह चांगला उंच व संपूर्ण लाल माणकांचा बनवला होता. प्रत्यक्ष विश्वकर्म्यानें तो भीमराजाला, इन्द्राचा त्याच्याविषयींचा स्नेह बघून, नजर केला होता. त्या माणकांच्या पतद्ग्रहांतून अरुणोदयासारखें लाल किरणमंडल बाहेर पडतांना पाहून लोकांना वाटलें : " ताम्बूलविलासी नलाच्या मुखांतून टाकलेल्या तांबूलाचे कणच यांत भरलेले आहेत. " — लाल माणकांची रिकामी पिकदाणी लोकांना तांबूलरसानें रंगलेली वाटली !

पतद्ग्रहा- ( पिकदाणी ) चा उपयोग ताम्बूलाकरितां नसला तरी गुळण्या टाकण्याकरितां, हात धुण्याकरितां एक भांडें म्हणून बुद्धकालींहि करीत असत असें आढळून येतें. सुप्रसिद्ध चिनी प्रवासी फाहिएन यानें

५६. 'शब्दकोश' – ( य. रा. दाते व चिं. ग. कर्वे ) बघावा.

५७. 'नामलिङ्गानुशासनम्' ( पान ३९० ) — संपादक गणपतिशास्त्री, त्रिवेन्द्रम्, १९१४.








केलेल्या आपल्या प्रवासवर्णनांत (इ.स. ३९९–४१४), त्याला काशगर देशांत बुद्धाचीं पिकदाणी पहावयाला मिळाली असें लिहिलें आहे. ती भिक्षापात्रासारखीच दगडाची बनविलेली होती.– 'विनयपिटकां'तील 'महा-वग्ग' या भागांत 'पतिग्गह' (पिकदाणी किंवा तस्त) हा शब्द मोठ्या मजेदार प्रसंगानें आला आहे. तो प्रसंग असा : "त्यावेळचा सुप्रसिद्ध वैद्य कोमारभच्च यानें साकेत नगरांतील एका श्रेष्ठीच्या पत्नीला औषधोपचार केला. तिला ७ वर्षांचा जुना डोकेंदुखीचा आजार होता. वैद्यानें औषधी तूप तिच्या नाकांत घातलें. तें तूप तिच्या तोंडांतून बाहेर येऊं लागलें. लगेच ती तें सर्व तूप पतिग्गहांत (पिकदाणींत) थुंकली व आपल्या दासीला म्हणाली 'मुली जा, कापूस किंवा फडकें घेऊन ये व त्याला हें सर्व टिपून घे'. वैद्याला ही त्या बाईची भलतीच काटकसर पाहून चमत्कारिक वाटलें. बाईनें तें ओळखलें व ती वैद्याला म्हणाली: 'वैद्यराज, आमच्या सारख्या गृहिणींना अशा काटकसरी करायची संवयच असते. ह्या तुपाचा उपयोग नौकरांना त्यांच्या पायाला चोळायला होईल किंवा त्याचा दिव्याकरितांहि उपयोग होऊं शकेल. आपण चमत्कारिक वाटून घेऊं नका. तुमच्या औषधोपचाराची व सल्ल्याची सर्व फी मी देईन !" -यावरून घरगुती पतिग्गहाचा उपयोग दोन हजार वर्षांपूर्वीपासूनचा आढळून येतो.

चरकसंहितेंत (सूत्रस्थान १५.७) "आजाऱ्याच्या खोलींत पिकदाण्या, तस्तें ठेवावींत (उपन्यस्त-भृङ्गारप्रतिग्रहाणि उपकल्पयेत्)" असा निर्देश आला आहे. व्याख्याकार चक्रपाणि प्रतिग्रहाचा अर्थ 'प्रति-गृह्णन्ति इति प्रतिग्रहाः पतद्‌ग्रहाः' (पडलेलें घेणारें तस्त वा पिकदाणी) असा देतो. चरकानें एका 'ललाटप्रतिग्रहा'चा उल्लेख केला असून तें 'अनपत्र-णीय' म्हणजे 'अलज्जाविषय' म्हणजेच चांगलें, लाज न वाटण्याजोगें, चारचौघांसमक्ष उजळपणें वापरण्या-जोगें असतें असें म्हटलें आहे. यावरून 'ललाट-प्रतिग्रह' म्हणजे ललाट 'कपाळ' किंवा तोंड धुण्याचें तस्त किंवा भांडें असावें व तें पिकदाणीपेक्षां अधिक सोज्वळ गणलें गेलें असावें असें दिसतें. यावरून असा तर्क करावयास हरकत नाहीं कीं चरकाच्या वेळींहि हल्लींप्रमाणें स्वच्छतेचीं नाना प्रकारचीं व नाना उप-योगाचीं तस्तें व भांडीं असावींत.

बाणाच्या 'हर्षचरितां'त (इ. स. ६३०) "सेवक राजाचें सोन्याचें पादपीठ, तांबूलाचा करङ्क (डबा), कळश्या, तस्तें किंवा पिकदाण्या (पतद्‌ग्रह) आणि स्नानाचीं घंगाळें वाहून नेत होते" ('गृहीतसौवर्ण-पादपीठीपर्यङ्ककरङ्ककलशपतद्‌ग्रहावग्राहैः' – बॉम्बे संस्कृत सीरिज-आवृत्ति, पान २८५) असा उल्लेख आहे.

तांबूलाच्या उपयोगाकरितां पिकदाणी म्हणून पतद्‌ग्रहाचा सर्वांत जुना उल्लेख वात्स्यायनाच्या 'काम-सूत्रां'त (इ. स. १००) आहे. नागरिकांच्या शयनगृहांत कोणत्या वस्तू असाव्या याचें वर्णन कर-तांना तो म्हणतो : "वासगृहांत अनुलेपन (फुलां-पासून केलेलीं सुगंधी उटणीं), माल्यं (फुलांच्या माळा), सिक्थकरण्डक (रंगीत मेणाचीं भांडीं), सौगंधिकपुटिका (सुगंधी द्रव्यांच्या डब्या), मातुलुङ्गत्वचः (डाळिं-बाच्या साली), ताम्बूल (विडे) आणि खालीं जमिनीवर पतद्‌ग्रह (पिकदाणी) हीं ठेवावींत." (१.४) यासंबंधीं व्याख्याकार यशोधर असें स्पष्टीकरण देतो : "विडे रात्रीं सेवनाकरितां तयार ठेविलेले असावेत. खालीं भुईवर पतद्‌ग्रह असावा, उंचावर असूं नये. त्या योगानें वरून नायकानें थुंकलेला तांबूल वगैरे खालीं भुईवरील तस्तांत पडेल."

भर्तृहरीनें 'शृंगारशतकां'त पिकदाणीला 'निष्ठी-वनशराव' असें म्हटलें आहे : "कोणता कुलीन पुरुष वेश्येच्या अधरपल्लवाचें– तो कितीहि मनोज्ञ असला तरी– चुंबन घेईल? तो अधरपल्लव म्हणजे गुप्त हेर, योद्धे, चोर, चेट यांचें 'निष्ठीवनशरावच' होय."[५८]

वरील उल्लेखांवरून पिकदाणीच्या बुद्धकालापासून म्हणजे सुमारें क्रिस्तपूर्व ५६३ पासून अडीच हजार वर्षांच्या इतिहासाचें ओझरतें दर्शन घडून येईल.

## तांबोळी जात

विड्याच्या पानांच्या व तांबूलाच्या व्यवहारावर चरितार्थ करणाऱ्यांची एक तांबोळी जात मानली गेली. गागाभट्टानें (इ. स. १६२०–१६८५) यानें 'कायस्थ-धर्मप्रदीपां'त तांबोळी जातीचा उल्लेख असा केला

५८. 'कश्चुम्बति कुलपुरुषो वेश्याधरपल्लवं मनोज्ञमपि । चारभटचोरचेटकनिष्ठीवनशरावम् ॥'



अनुक्रमणिका






आहे[५९] : "तांबूली हा शब्द मध्यदेशभाषेंत रूढ आहे. पानवेलीचीं पानें विकून त्यावर चरितार्थ करणारा हा शूद्रापेक्षांहि हीन आहे. तांबूली ही अनुलोम संतति आहे. क्षत्रियाला शूद्र मुलीपासून झालेलें संतान उग्र या नांवानें संबोधिलें जातें. त्याचा उदरनिर्वाहाचा धंदा तांबूलविक्रय हा होय". शिवकालीन 'राजव्यवहार-कोशां'तहि 'तांबूलिकस्तु तांबोळी' असा उल्लेख आहे. वात्स्यायनाच्या 'कामसूत्रां'तहि ताम्बूलिकाचा उल्लेख इतर व्यावसायिकांबरोबर केलेला आहे : "रजक–नापित – मालाकार – गांधिक – सौरिक – भिक्षुक–गोपालक – ताम्बूलिक – सौवर्णिक – पीठमर्द – विट – विदूषकादयः मित्राणि ॥" (१.५).

---

५९. राजवाड्यांची गागाभट्टी. परिशिष्ट – अ – पानें ९ व २५.













श्री. म. ह. दाते

# नासदीय सूक्त : २ :

' न नरेणावरेण प्रोक्त एष सुविज्ञेयो बहुधा चिन्त्यमानः ।
अनन्यप्रोक्ते गतिरत्र नास्ति अणीयान्
ह्यतर्क्यमणुप्रमाणात् ॥ ' ( कठ. २-८ )

अनधिकारी पुरुषाकडून ( मग तो कितीहि विद्वान ) असो ) हें आत्मतत्त्व कितीहि समजावून घेतलें व त्यावर चिंतन केलें तरी समजणें शक्य नाहीं. अनुभवी व ज्ञानी संताकडून जर हें आत्मतत्त्व समजावून दिलें गेलें नाहीं तर हें तत्त्व समजणें कठीण आहे; कारण तें अत्यंत सूक्ष्म वस्तूपेक्षां सूक्ष्म व तर्कानें जाणतां येण्यासारिखें नाहीं.

मागील लेखांत वेदांतील व मनुस्मृतींतील सूक्तें व वचनें घेऊन सृष्टीच्या उत्पत्तीसंबंधी त्यांची कशी एकवाक्यता आहे हें दाखविलें. आतां या लेखांत नासदीय सूक्तासंबंधीं विचार करावयाचा आहे. वेदांतील व उपनिषदांतील वचनांचा ह्या सूक्ताशीं कसा मेळ बसतो हें दाखवावयाचें आहे. अनुभव सर्वत्र एकच असतो. जो अनुभव वसिष्ठ-वामदेवादिकांचा तोच अनुभव संताचा असतो. वस्तू तीच असल्यामुळें वेगळा अनुभव येणें शक्य नाहीं. शब्दामधें फरक झाला तरी अर्थामध्यें फरक नाहीं. कित्येक वेळां शब्द तोंच पण साधकाच्या बुद्धीप्रमाणें त्याला समजेल अशा युक्तीनें अर्थांत बदल करून त्याचा अर्थ करावा लागतो. कारण शब्दांच्या धातूंचे अनेक अर्थ असतात. त्यामुळें साधकाला झेंपेल अशा रीतीनें अर्थ सांगून त्याचें समाधान करावें लागतें. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें श्रुति-श्रुतींचा विरोध दिसतो पण मूळ अर्थाशीं त्यांचा विरोध येणें शक्य नाहीं. ते अनुभवाचे शब्द आहेत.

## विचारवंतांना प्रार्थना

नासदीय सूक्ताच्या अर्थाला आरंभ करण्यापूर्वी ज्ञानी जनांना माझी प्रेमपूर्वक प्रार्थना आहे; ती अशी–

' परीक्षावंतापुढें रत्न । ठेवितां होय समाधान ।
तैसें ज्ञानियापुढें ज्ञान । बोलावें वाटे ॥ '

आपण मला सांभाळून घ्याल व माझ्या चुका दाखवून मला योग्य मार्गदर्शन कराल अशी मी खात्री बाळगतो. मी एक साधक आहे व माझ्या साधनावस्थेंत कांहीं चुकत असल्यास मला मार्गदर्शन करण्याचें काम संतांचें आहे. अशी नम्र प्रार्थना करून मूळ विषयाकडे वळूं या.

## नासदीय सूक्त

नासदीय सूक्त ऋग्वेदाच्या दहाव्या मंडळांत १२९ वें आहे. याचा ऋषि परमेष्ठि प्रजापति व देवता परमात्मा आहे. हींच सूक्तें अथवा श्रुति तैत्तिरीय ब्राह्मण २-८-९ सृष्टिप्रकरण यांतील आहेत. व ह्या सृष्टि-प्रकरणाच्या नऊ ऋचा असून त्या नासदीय सूक्त म्हणून प्रसिद्ध आहेत.

## पहिलेंसूक्त –

नासदासीन्नो सदासीत्तदानीं
नासींद्रजो नो व्योमा परो यत् ।
किंमावरीवः कुह कस्य शर्मन्
अम्भः किमासीद् गहनं गभीरम् ॥१॥

**लो. टिळक :**— तेव्हां म्हणजे मूळारंभीं असत् नव्हतें आणि सत् हि नव्हतें. अंतरिक्ष नव्हतें आणि त्यापलिकडचें जें आकाश तेंहि नव्हतें. ( अशा स्थितींत ) कोणी ( कोणाला ) आवरण घातलें ( म्हणावें )? कोठें ? कोणाच्या सुखासाठीं ? अगाध व गहन पाणी ( तरी ) होतें काय ?

**श्री शंकराचार्य** भाष्याचा अनुवाद — जेव्हां पहिल्या सृष्टीचा लय होऊन पुढील सृष्टि उत्पन्न झाली नव्हती, तेव्हां सत् व असत् हीं दोन्हींहि नव्हती. नामरूपानीं युक्त असल्यामुळें स्पष्टपणें अनुभवाला येणारें जें जगत् त्याचा सत् शब्दानें येथें निर्देश केला आहे, आणि मनुष्यशृंगादिकाप्रमाणें जें अभावरूप त्याचा असत् या पदानें निर्देश केला आहे. हीं दोन्हींहि त्यावेळीं नव्हतीं; परंतु कांहीं अव्यक्तावस्था होती. ती स्पष्ट नसल्यामुळें विद्यमान होती असेंहि म्हणतां येत नाहीं आणि जगताची उत्पा-

दक ह्या नात्यानें तिचें अस्तित्व असल्यामुळें ती विद्यमान नव्हती असेंहि म्हणतां येत नाहीं. 'नो सदासीत्' असें जें संक्षेपतः सांगितलें आहे तेंच पुढें सविस्तर सांगितलें आहे. त्यावेळीं रज नव्हतें, याचा अर्थ सत्त्व, रज व तम हे तिन्ही गुण नव्हते, रजः शब्द सत्त्व, रज, तम ह्या तिन्ही गुणाकरितां घातलेला आहे. असा अर्थ ह्या ठिकाणीं विवक्षित आहे. व्योम नव्हतें. व्योम म्हणजे आकाश. हा व्योम शब्द ह्या ठिकाणीं पंचमहाभूतांकरितां घातलेला आहे; आणि म्हणूनच 'नो व्योम' ह्याचा अर्थ–पृथ्वी, अप्, तेज, वायु व आकाश हीं पांच भूतेंहि नव्हतीं असा ह्या ठिकाणीं विवक्षित आहे. तीन गुण आणि पांच भूतें ह्याहून इतरहि पदार्थ जो दृष्टोत्पत्तीस येत असतो तोहि त्यावेळीं नव्हता. पर्वत, नद्या, समुद्र इत्यादि इतर पदार्थ होत. "ज्याप्रमाणें त्या वेळीं भूतें नव्हतीं त्याचप्रमाणें कांहीं भौतिकहि त्यावेळीं नव्हतें" हें ह्यांतील तात्पर्य होय. भूतभौतिक असा जो तीन्ही गुणांचा निषेध ह्या ठिकाणीं केला आहे त्याच्या योगानें ब्रह्मांडाचाहि निषेध केल्यासारिखें झालें आहे. सारांश त्यावेळीं ब्रह्मांड नव्हतें, हें 'नासीद्रजो नो व्योमापरोयत्' ह्या वाक्याचें तात्पर्य होय. ब्रह्मांडाचे बाहेर महत्तत्त्वादि आवरणें आहेत असें पौराणिक म्हणत असतात. परंतु हा आवरण समुदाय आक्षेप दर्शक 'किं' 'कुह' आणि 'किं' ह्या तीन शब्दांनीं निषिद्ध केला आहे. आवरण म्हणजे पडदा-झांकण, आच्छादन. झांकला जाणारा कांहीं पदार्थ असल्याशिवाय आवरणाची सार्थकता नाहीं. ह्यास्तव त्यावेळीं आवरण होतें असें जर म्हणावें तर झांकला जाणारा अथवा आच्छादला जाणारा कांहीं तरी पदार्थ अवश्य असला पाहिजे. परंतु ब्रह्मांडाचाच जर त्यावेळीं ठिकाणा नव्हता तर त्या महत्तत्त्वप्रभृति आवरणांनी कोणता पदार्थ आच्छादिला जाणार आहे ? तस्मात् झांकलें जाणारें अथवा आच्छादिलें जाणारें जर कांहींच त्यावेळीं नव्हतें, तर आवरणहि त्यावेळीं संभवनीय नव्हतें. हा 'किमावरीवः' ह्या शब्दाचा अभिप्राय आहे. 'कुह' ह्या पदानें देशाविषयीं आक्षेप घेतला असून 'कस्य शर्मन्' ह्या पदानीं निमित्ताविषयीं आक्षेप घेतला आहे. कोणत्या प्रदेशामध्यें भोक्त्याकरितां हें आवरण संभवणार आहे ? त्यावेळीं कोणताहि प्रदेश विद्यमान नसतो आणि सुखाचा उपभोग घेणाराहि कोणी नसतो. 'आपो वा इदमग्रे सलिलमासीत' ही श्रुति अवांतर प्रलयासंबंधानें आहे. ही ऐकून एखादा मंदमति पुरुष महाप्रलयासमयींहि तशा प्रकारचें उदक असतें, अशा भ्रमांत पडण्याचा संभव आहे. ह्यास्तव त्या भ्रमाचें निरसन होण्याकरितां 'अम्भः किमासीत्' ह्या वाक्यानें जलाचा निषेध केला आहे. प्रवेश करण्यास अशक्य आणि अगाध असल्यामुळें आंत उभें राहण्यासहि अशक्य असें उदक त्यावेळीं होतें काय ? मुळींच नव्हतें. हें त्या वाक्याचें तात्पर्य होय.

सामान्य साधकांच्या करितां ह्या ऋचेचा अर्थ असाच करावयास पाहिजे.

ब्रह्मज्ञान जरी कळे उठाउठी ।
तरि कां हिंपुटी वेदशास्त्रें ॥ १ ॥
शास्त्रांचें भांडण तप तीर्थाटण ।
पूर्वीचें भ्रमण याचसाठीं ॥ २ ॥
याचसाठीं जप यात्रसाठीं तप ।
व्यासेही अमूप ग्रंथ केले ॥ ३ ॥
याजसाठीं संतपाय हे सेवावे ।
तरीच तरावें तुका म्हणे ॥ ४ ॥

या तुकाराम महाराजांच्या उक्तीप्रमाणें संतांना शरण जाऊन ते काय अनुभवाचे बोल बोलतात तें आपण पाहूं :—

श्रुति सांगितलें उपनिषदीं अनुवादलें ।
आम्हा लाधले निरुते वर्म ।
अनुभवि गोविंदु करितां अनुवादु ।
परब्रह्म अनुवादु तरितें नव्हें ॥ १ ॥
बोलिजे तें नव्हें दाविजे तें नव्हें ।
गुरुमुखीं पहावें परमानंदी ॥ ध्रु. ॥
अरुप परी बरवे दिसे । भीतरी कैसे निववीतुसे ।
अनुभविया प्रति बोलिजे लक्षण ।
ज्ञानदेवें खूण सांगितली ॥ २ ॥
—श्री ज्ञान० गाथा.

जें नाहीं म्हणो जाइजे । तव विश्वाकारें देखिजे ।
आणि विश्वचि ऐसें म्हणिजे । तरि हे माया ॥
रूप वर्ण व्यक्ति । नाहीं दृश्य द्रष्टा स्थिति ।
तरि कोण कैसे आथी । म्हणावें पां ॥
आणि साचचि जरी नाहीं । तरि महादादि कोणे ठाई ।
स्फुरत कैचे काई । तेणे वीण असे ॥

म्हणोनि आथी नाथी हे बोली।
जे देखोनि मुकी जाहली।
विचाराची मोडली। वाट जेथें ॥
— श्री ज्ञानेश्वरी.

निर्गुणाची वार्ता सगुणी मांडली।
सगुण निर्गुण दोन्ही एकरूपा आली॥
सगुण नव्हे ते निर्गुण नव्हे।
गुरुमुखें चोजवले जाणीतले पां॥ १॥
रखुमादेविवरू निराकारू नव्हे।
कांहीं न होनि होये तोचि बाई येवो॥
— श्री ज्ञान० गाथा.

जो उघड कीं न दिसे। प्रकाश कीं न प्रकाशे।
असतेपणे नसे। कव्हनीकडे॥
— श्री ज्ञान० अमृत.

श्रीरामदास काय म्हणतात ते पहाः—

'आहे तितुकें नाहीं जाले। नाहीं नाहींपणे निमाले।
आहे नाहीं जाऊन उरलें। नसोन कांहीं॥.

एक हिंदी कवी—

है कहूं तो है नहीं, और नहीं कहा नहि जाय।
है नहीं के बीचमें, सारा जगत् समाय॥

कबीर काय म्हणतात तें पहाः—

'पंडित मिथ्या करहु विचारा,
नहि तहँ सृष्टि न सिरजन हारा।
स्थूल, अस्थूल पवन नहि पावक,
रवि, ससि, धरनि न नीरा॥
ज्योति स्वरुप काल नहिं उहवाँ,
बचन न आहि सरीरा।
करम धरम कछुवौ नहि उहवाँ,
ना उहाँ मंत्र न पुजा॥
माय बाप गुरु जाके नाहीं,
सो दुजा कि अकेला।
कहहि कबीरा जो अबकी बूझे,
सो गुरु हम चेला॥

त्याचप्रमाणें —

कहो उस देसकी बतियाँ,
जहाँ नहि होत दिन रतियाँ।
नही रवि चंद्र औ तारा,
नही उँजियार अँधियारा॥
नही तहाँ पवन औ पानी,
गये उस देस जिन जानी।
कबीर का देस है न्यारा,
लखे कोइ नामका प्यारा॥

श्री संत तुकाराम —

जेव्हां नव्हती पृथ्वी आणि तारांगणें।
तेव्हां नारायण निर्गुण मूर्ति॥ १॥
जेव्हां नव्हते आप तेज आणि अग्नि।
तेव्हां निरंजनीं नारायण॥ २॥
जेव्हां नव्हता चंद्र वायु आणि सूर्य।
तेव्हां निरामय निर्गुण मूर्ति॥ ३॥
तुका म्हणे तेथें ज्योत मिळविली।
बाबाजीनें केली कृपा मज॥ ४॥

त्याचप्रमाणें :—

नव्हे आधींचे मधींचे।
आम्ही देवाही आधींचे॥ १॥
जेव्हां नव्हते पवन पाणी।
तेव्हां होतो निरंजनीं॥ २॥
जेव्हां नव्हता दुमदुमकार।
तेव्हां होतो निर्विकार॥ ३॥
जेव्हां नव्हते चराचर।
तेव्हां होतो शून्याकार॥ ४॥
जे जे झाले अवतार।
तुका त्याचे बरोबर॥ ५॥

आणखी —

आहे देव ऐसी वदवावी वाणी।
नाहीं ऐसा मनीं अनुभवावा॥१॥ श्री तुकाराम.

एकनाथमहाराज :—

गो गोरसातीत स्वानंद साखरेसी।
प्रेमे पेहे पाजीन सख्या सोयऱ्यासी॥ १॥
घेईं घेईं बाळा घोट एक।
झणी पायरव होईल कुशली पडे तर्क॥२॥
दृश्य न दिसे तें काळीं अवघे लावी होटी।
सद्युक्तिचें शिंपीवरी गिळीतैसे घोटी॥ ३॥
अंतर तृप्त झाले सबाह्य कोंदले।
निज गोडिये गोडपण तन्मय जाले॥ ४॥
सद्गुरुमाऊली पेहे पाजी अंगीं भरला योग।
तेणें देहबुद्धि समूळ केला त्याग॥ ५॥







पंचभूतांचे अंगुले सुवर्ण हारपले ।
माझे माझे म्हणत होते त्या गुणा विसरले ॥ ६ ॥
आर्ताची हारली भूक जाले सुख ।
निजानंदी पालखी पहुडले स्वात्मसुख ॥ ७ ॥
पेहे पाजायाचे मिस देतसे पुष्टी तुष्टी ।
एका सामावला जनार्दना पोटी ॥ ८ ॥

आणखी :—

अग्नि हिवेला तापावें कोठें ।
पवना प्राणु नाहीं कवण लावी वाटे ॥ १ ॥
गगन हारपले पाहावों कवणें ठायीं ।
मन मुळीं लागले शांतिक ते पाही ॥ २ ॥
स्वादे जेवणार गिळिला पैजाणा ।
चवी सांगावया सांगते कवणा ॥ ३ ॥
एकाजनार्दनी जाणें एक खुणें ।
त्यासी भेटी घ्या कोणी त्या एकपणें ॥६॥

श्रीज्ञानेश्वर –

१. जन्म आवर्ती येरझारी फिटली ।
ब्रह्मसमदृष्टी जाली गुरूमुखे ॥ १ ॥
भागल्याचा सिणु भागल्यानें नेला ।
भाग्योदय झाला भाग्येवीण ॥ ध्रु ॥
रखुमादेविवरू भाग्यें जोडला ।
जोडोनि मोडला कांहीं नव्हतेपणें ॥ २ ॥

२. प्रकृतीचें पूजन प्राप्तीविण जाण ।
प्राप्ति सिंचन दोन्ही वाया गेली ॥ १ ॥
पूजन कवणा करूं सिंचन कवणा करूं ।
नाहीं नव्हे तें भरू गुरुमुखें ॥ २ ॥
रखुमादेविवरु गुरुमुखा म्याला ।
होता तो लपाला नाहीं ते ठायीं ॥ ३ ॥

ऋषींनीं आपले अनुभव संस्कृतमध्यें प्रगट केले आहेत तर संतांनीं तेच अनुभव मराठींतून अगर हिंदींतून प्रगट केले आहेत.

भाषाभेदाश्च वर्तन्ते ह्यर्थ एको न संशयः ।
पात्रद्वये यथा खाद्यं स्वादभेदो न विद्यते ॥

—अनुभव तोच त्यांत फरक होणें शक्य नाहीं.

## पहिल्या चरणाचा अर्थ–

नासदीय सूक्ताच्या पहिल्या ऋचेच्या पहिल्या चरणाचा अर्थ काय होतो त्यावर विचार करूं :

'नासदासीन्नो सदासीत्तदानीं'
'आहे नाहीं जाऊन उरले । नसोन कांहीं'
'होता तो लपाला नाहीं ते ठाईं'
'रखुमा देविवरु भाग्ये जोडला ।
जोडोनि मोडला कांहीं नव्हतेपणें'
'कांहीं न होनि होये तोचि बाई ये वो'

—त्या वेळची स्थिति अशी होती किंवा असते.

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते ।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥

सच्चिदानंदघन हें परब्रह्म सर्व प्रकारांनी पूर्ण आहे. हें ( जगत् ही ) पूर्ण आहे. ह्या पूर्ण ब्रह्मांतच हें पूर्ण उत्पन्न झालें आहे. ह्या पूर्णांतून हें पूर्ण काढून टाकिलें तरी पूर्णच शिल्लक राहतें.

श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतातः—

जें निर्गुण निराकार । निष्प्रपंच निराधार ।
निःसंग निर्विकार । पूर्ण घनतें ओळखे ॥
स्वयंभासी प्रतिष्ठा करणें । हें तों देखता अज्ञानपण ।
निजबिंबामाजी प्रतिबिंब बिंबले । तैसें सगुण निर्गुण तुजमाजीरया ॥

माझी प्रकृति निष्कृति जाली ।
ब्रह्मी सामावली बाई येवो ।
देहेवीण ब्रह्मदेखे देहेवीण ब्रह्मदेखे ।
तेणें निर्गुण राखे रोखावले ॥
जाणता म्हणोनि नेणता पै गेले ।
सेखी आपणाते विसरले बाई येवो ।
रखुमा देविवरूं नेणोनि जाणितला ।
जाणपणें निमाला माझ्या ठाईं ॥ ३ ॥

अनुभवी संत या स्थितीचें वर्णन असेंच करणार. या पलिकडे या स्थितीचें वर्णन होणें शक्य नाहीं.

तुज सगुण म्हणो का निर्गुण रे । तू एक गोविंदु रे ॥

या स्थितीला सत् म्हणण्याची पंचाईत, असत् म्हणण्याची पंचाईत, सगुण म्हणवत नाहीं, निर्गुण म्हणवत नाहीं, तेव्हां गोविंद म्हणावा झालं.

त्या स्थितींत काय असतें किंवा काय नसतें याचें विवरण दुसऱ्या व तिसऱ्या ऋचेंत केलेलें आहे. तें आपण त्या ऋचांचा अर्थ करितेवेळीं पाहूं.

## दुसऱ्या चरणाचा अर्थ–

आतां पहिल्या ऋचेच्या दुसऱ्या चरणांचा अर्थ काय होतो तो पाहूं:—

'नासीद्रजो नो व्योमापरोयत्'
'नाद बिंद कला ज्योति स्वरुपी विलया जाती ।
श्रुति नेति नेति म्हणती जेथ ॥' ( ज्ञा० गाथा. )



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

" नव्हता बाळा नादबिंदू तैं तूं रे सहज ।
तेथेचि तूं होतासी ऐसें ज्ञान पै तुज ॥
तेथेंचि तूं लीन होई करी आपुलें काज ।
संसार साभिमानें घेई तेथींचे व्याज ॥

–( ज्ञा. मदालसा )

त्यावेळेस रज नव्हतें म्हणजे बिंदु नव्हता. ( स्वरूपाचें भान नव्हतें ) व व्योम नव्हतें अर्थात व्योमाचा गुण शब्द, नाद आहे; तों त्या वेळेस नव्हता, तर त्याहून विलक्षण अशी सहजावस्था होती. श्री एकनाथ महाराज म्हणतात ही सहजावस्था केव्हां असते तर ज्या वेळेस :

'जाणीवा जाणपण नेणीवा नेणपण ।
दोहींच्या विंदानें सहजाचें दर्शन ॥

अशी स्थिति होते त्यावेळेस ही सहजावस्था प्राप्त होते. हिलाच ' पूर्णावस्था ' म्हणतात.

**तिसरा चरण–**

किमावरीवः कुह कस्य शर्मन् ।

–आवरण कसलें ? कुठें ? कोणाच्या सुखाकरितां ? असें ह्या चरणांत प्रश्न केले आहेत. त्यांचीं उत्तरें तिसऱ्या ऋचेंत दिलीं आहेत. त्या तिसऱ्या ऋचेचा अर्थ करतांना ह्या प्रश्नांचीं काय उत्तरें आहेत तीं त्या वेळेस पाहूं.

**चवथा चरण–**

' अम्भः किमासीद् गहनं गंभीरम् '

गहन आणि गंभीर असें अत्यंत सूक्ष्म स्वसंवेदन तरी होतें कां ? ह्या प्रश्नाचें उत्तर दुसऱ्या सूक्तांत दिलें आहे. अम् म्हणजे अतिसूक्ष्म व अम्भः म्हणजे स्फुरण, स्वसंवेदन. ऋग्वेदकालीं प्रश्न व त्याचें उत्तरहि प्रश्नात देण्याची रीत होती, त्याप्रमाणें येथेंहि प्रश्न व त्याचें उत्तर त्यांतच आहे. आवरण होतें कां ? होतें. कुठें होतें ? त्याठिकाणीं होतें. कोणाच्या सुखाकरितां होतें ? सुखाच्या सुखाकरितां होतें —

'तेथें सुखासि सुख जाण भोगिताहें' (ज्ञान. गाथा)

अत्यंत सूक्ष्म, गंभीर व गहन असें स्फुरण होतें कां ? होतें. ह्याचीं उत्तरें पुढल्या सूक्तांत दिलीं आहेत. हें सर्व पूर्ण असल्यामुळें 'कांहीं नव्हतें' म्हणून कसें चालेल ? सर्व असलेंच पाहिजे. कारण श्री माऊली म्हणते—

' साचचि जरी नाहीं । तरी महदादि कोणें ठायीं ।
स्फुरण कैचें कांहीं । तेणेंवीण असे ॥
म्हणोनि आथी नाथी बोली ।
जे देखोनि मुकी जाहली ।
विचाराची मोडली । वाट जेथें ॥ ( ज्ञानेश्वरी )

श्रीतुकाराम म्हणतातः –

तुका म्हणे तेथें ज्योत मिळविली. ॥

श्रीरामदास :–

आहे नाहीं जाऊन उरले । नसोनि कांहीं ॥

श्रीकबीरः — कबीरका देस है न्यारा ॥

– हे संतांचे अनुभव काय खोटे आहेत.

हा पूर्णते तरी आधारू । सिंधु जैसा दुर्भरु ।
तैसा विरुद्धा पाहुनेरू । याचा घरीं ॥

( अमृता. श्रीज्ञाने० )

मेघांनीं समुद्राचें कितीहि जरी पाणी उपसलें तरी समुद्र बोटभरसुद्धां कमी होत नाहीं; व त्याचप्रमाणें जगांतील सर्व नद्या अथांग भरून जरी ह्यास मिळाल्या तरी हा थोडासासुद्धां वाढत नाहीं म्हणून समुद्र जसा स्वभावतःच परिपूर्ण आहे तसाच अत्यंत दुर्भर म्हणजे भरून काढण्यास अत्यंत कठीण आहे. त्यांत नद्यांनी कितीहि जरी पाणी आणून ओतलें तरी तें सर्व गट्ट करून पुनः आपला तान्हेलाच असतो. समुद्राच्या ठिकाणीं जशी पूर्णतेची पराकाष्ठा आहे तशीच अपूर्णतेचीहि पराकाष्ठा आहे हें स्पष्ट आहे. समुद्राच्या ठिकाणीं पूर्णता व अपूर्णता ह्या परस्पर विरुद्ध धर्माचा सारखाच पाहुणचार होत असतो. तसाच ह्या ठिकाणीं सत् असताचा द्वैताद्वैताचा आहे नाहीं ह्या दोन विरुद्ध धर्मांचा सारखाच पाहुणचार होत असतो. केवल एकत्वसुद्धां म्हणण्याची पंचाईत परंतु आनंदघन असें हें ब्रह्म स्वरूप किंवा परमात्मतत्त्व आहे; हें शब्दांनी किंवा बोटांनीं दाखविण्यासारखें नाहीं. श्री ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात त्याप्रमाणें–

' जैसे शारदीचिये चंद्रकळे । माजि अमृतकण कोंवळे ।
ते वेंचिती मनें मवाळें । चकोरतलगे ॥
तियापरी श्रोता । अनुभवावी हे कथा ।
अति हळुवारपण चित्ता । आणूनिया ॥
हें शब्देंवीण संवादिजे । इंद्रिया नेणता भोगिजे ।
बोला आदि झोंबिजे । प्रमेयासी ॥

जैसे भ्रमर पराग नेती । परिकमलदलें नेणती ।
तैसी परी आहे सेविती । ग्रंथी इयें ॥
कां आपुला ठाय न सांडितां ।
आलिंगिजे चंद्र प्रगटता ।
हा अनुराग भोगिता ।
कुमुदिनी जाणे ॥
ऐसेनि गंभीरपणें ।
स्थिरावलेनि अंतःकरणें ।
आथिला तोचि जाणे ।
मानू इये ॥
जे अपेक्षिजे विरक्ती ।
सदा अनुभविजे संती ।
सोहंभावे पारंगती । रमिजे जेथ ॥

## दुसरें सूक्त

आतां आपण दुसऱ्या सूक्ताचा काय अर्थ होतो तो पाहूं :—

' न मृत्युरमृतं तर्हि न ।
रात्रिया अह्न आसीत प्रकेतः ।
आनीदवातꣳ स्वधयातदेकम् ।
तस्माद्धान्यंनपरः किंचनास ॥

लो० टिळक :– तेव्हां मृत्यु म्ह० मृत्युग्रस्त नाशवंत सृष्टि नव्हती व म्हणून दुसरा अमृत म्हणजे अविनाशी नित्य पदार्थ- (हा भेद) हि नव्हता. तसेंच रात्र आणि दिवस यांचा भेद कळण्यास कांहीं साधन (= प्रकेत) नव्हतें. (जें काय होतें) तें एकलें एकच स्वधेनें म्हणजे आपल्या शक्तीनें वायुशिवाय श्वासोच्छ्वास करीत म्हणजे स्फुरत होतें. त्याखेरीज किंवा त्या पलिकडे दुसरें असें कांहींच नव्हतें.

श्रीशंकराचार्य :– त्या महाप्रलय-प्रसंगीं प्राण्यांना येणारा मृत्यु नव्हता, कारण प्राण्यांचाच त्यावेळीं अभाव होता; आणि म्हणूनच जीवनहि त्यावेळीं नव्हतें. रात्रीचें चिन्ह चंद्रनक्षत्रादिक आणि दिवसाचें चिन्ह सूर्य हीं दोन्हीहि त्यावेळीं नव्हतीं. परंतु सर्व उपनिषदामध्यें प्रसिद्ध असलेलें एक ब्रह्म मात्र स्वधेसहवर्तमान होतें. स्वधा म्हणजे स्वतःच्या आश्रयाला असलेली सर्व जगत्कारण-रूप माया. 'आनीत' ह्या शब्दाचा अर्थ चलन म्हणजे चेष्टावाचक असा या ठिकाणीं विवक्षित नाहीं. ' आनीत ' म्हणजे अस्तित्व एवढाच अर्थ येथें विवक्षित आहे. आणि म्हणूनच ' अवातं ' हें विशेषण दिलें आहे. ' अवातं ' म्हणजे वायुरहित, अर्थात् निश्चल. त्या एका ब्रह्माहून दुसरी कोणतीहि उत्कृष्ट वस्तु त्यावेळीं नव्हती. जगंतच त्यावेळीं नव्हतें हें पूर्वीच सांगितलें असल्यामुळें ब्रह्माहून निष्कृष्ट वस्तु त्यावेळीं नव्हती हें सिद्धच आहे. सारांश उत्कृष्ट व निष्कृष्ट अशी कोणतीहि ब्रह्मव्यतिरिक्त वस्तु त्यावेळीं नव्हती हा ह्या शेवटल्या वाक्याचा अर्थ होय. "

नैवेह किंचनाग्र आसीन्मृत्युनैवेदमावृतमासीत् ।
अशनायद्याशनाया हि मृत्युस्तन्मनोऽकुरुताऽऽत्मन्वी-
स्यामिति ॥ बृहदा०

(सृष्टीच्या) आरंभी कांहींहि नव्हतें. हें सर्व अशनायारूपी मृत्यूनें आवृत्त होतें. मृत्यु म्हणजे अशनाया (मजा करणें, रति,). त्यानें आत्मवान् व्हावें या इच्छेनें मन (निर्माण) केलें, किंवा मी आत्म्यानें युक्त व्हावें असा संकल्प केला.

या सूक्तांत मृत्यु या शब्दाचा अर्थ enjoy भोग भोगणें, रति, मजा करणें असा आहे व अमृत या शब्दाचा अर्थ सुख, आनंद असा आहे.

' योगवियोगै रहितो योगी भोगविभोगै रहितो भोगी ।
एवं चरति हि मन्दं मन्दं मनसा कल्पित सहजानंदम् ॥
–अवधू० गीता.

–त्यावेळीं रति म्हणावी तर रति नव्हती, आनंद किंवा प्रेम म्हणावें तर तेंहि नव्हतें. नामरूपात्मक जगत् जिथें आपल्या मूळ स्वरूपांत सुरक्षित असतें (रात्रिः) अशी जी मूळ अव्यक्त अवस्था, तिचाहि कांहीं थांगपत्ता नव्हता. कारण उघड आहे.

'आश्लिष्यात्मानमात्मा न किमपि सहसैवांतरं वेद बाह्यं ।
यद्वत्कामी विदेशात्सदनमुपगतो गाढमाश्लिष्य कान्ताम्' ॥
– शत. श्लो.

–ज्याप्रमाणें परदेशांतून घरीं आलेला विषयी पुरुष स्त्रीला आलिंगून सुख घेतो व त्यापुढें आंतील (गृहांतील) व बाहेरील दुसरें कांहीं एक जाणत नाहीं, त्याचप्रमाणें जीव परमात्म्याला एका एकीं आलिंगितो आणि त्यामुळें आंतील (देहांतील) व बाहेरील ज्ञान त्याला होत नाहीं. (श्री शंकर० शत. श्लो.)

" तद्यथा प्रियया स्त्रिया संपरिष्वक्तो न बाह्यं किंचन वेद नान्तरमेवमेवायं पुरुषः प्राज्ञेनात्मना संपरिष्वक्तो न बाह्यं किंचन वेद नान्तरं तद्वा अस्यैतदाप्तकाममात्मकाममकामꣳ रूपꣳ शोकान्तरम् ॥ (चतुर्थो-










ऽध्यायः २१ तृती० ब्रा० बृहदा० ) "ज्याप्रमाणें आपल्या प्रिय भार्येला आलिंगन देणाऱ्या पुरुषाला बाहेरील ज्ञान किंवा आंतील ज्ञान रहात नाहीं त्याचप्रमाणें हा ज्ञानमय आत्म्यानें संपरिष्वक्त पुरुष कैवल्यपदावर ब्रह्माशीं एकरूप होत्साता बाहेरचें कांहीं जाणत नाहीं आणि आंतलेंहि कांहीं जाणत नाहीं. या आत्म्याचें हेंच रूप आप्तकाम; (=सर्व कामांनीं युक्त) आत्मकाम (=आत्मा हाच ज्याचा काम आहे असें) कामरहित आणि शोकरहित असें आहे." आतां आपण संताच्या अनुभवांनीं याचा अर्थ काय होतो तो पाहूं. कारण या स्थितीचें बरोबर आकलन होण्यास व ती स्थिति कशी असते हें समजण्यास संताचा स्वानुभव हाच एक मार्ग आहे. श्रीज्ञानेश्वर—

१. 'दीप प्रकाश दीपीं सामावला,
कलिके सामावली ज्योति ।
जोति सामावोनि बिंब हारपले,
तैसी झाली स्वयें स्थिति ।।

२. दृश्यादृश्य नातळे स्थूल प्रपंचभान ।
तेथें मायेचें कारण हेत नाही ।
म्हणोनि ज्ञानविज्ञान कल्पना लक्षण ।
तेथें सुखासि सुख जाण भोगिताहे ।। १ ।।
नामा वाचूनि संवादे निवृत्ति अभेदपदे ।
निजभजनी स्वानंदे नवल पाहे ।। ध्रु० ।।
तेथें दिवस ना रात्री सर्व हेतु विवर्जितु ।
स्वयंभासक तूं नवल त्याचे चिन्मय ना चिन्मात्र ।
वेद्य सर्वगत स्वसंवेद्य ।
साक्षभूत आपणवासी ।। २ ।।
स्वसंवेद्य सन्मुखता भेदु नाहीं ।
आतां भक्ति आणि परमार्थी हेंचि रूप ।
निवृत्तिप्रसादे संपर्केसि बोध ।
नीच नवा आनंद ज्ञानदेवा ।। ३ ।।

३. रूप पाहोनिया दर्पण ठेलें ।
शेखीं आभास दृष्टी राहिला ।
न पाहता मुख जाणे ।
तो आपण तैसा अनुभव जाला रया ।। १ ।।
याप्रपंचाचे कवच सांडुनि ।
बाहेरी अविद्या दृश्य संहारी ।
पदीं पद ग्रासुनि ठेलें
जें बुडोनि राहिलें अंतरी ।। २ ।।
चैतन्याचें मुसें हेलावती दिसें ।
जेंवि तरंगु सागरी ।
कुर्मीचिये परि आंगचि आवरी ।
तो स्थिर झाला चंद्रकरिरया ।। ३ ।।
तेथें जाणणें निमाले बोलणें खुटलें ।
जेंवि जीवनि जीवन निमालें ।
दशादिशा भरुनि दाटलें ।
किं सुख सुखासि भेटों आले ।। ४ ।।
ज्ञानदेव म्हणे आम्हा जिताचि मरणें ।
कीं कल्पकोटी जिणें ऐसें निवृत्तीनें केलें रया ।।५।।

श्रीमाऊलीच्या वचनाधारें दुसऱ्या सूक्ताच्या पहिल्या दोन चरणांचा अर्थ झाला. आतां तिसऱ्या चरणाचा अर्थ पाहूं :-

## तिसऱ्या चरणाचा अर्थ –

त्यावेळेस – 'आनीदवातऽ स्वधया तदेकम् ।
तस्माद्धान्यं न परः किंचनास ।।
" स्वयंभासक चिन्मय ना चिन्मात्र वेद्य
सर्वगत स्वसंवेद्य साक्षीभूत आपआपणासी – श्रीज्ञानेश्वर.

'आत्मा वा इदमेक एवाग्र आसीन्नान्यत्किंचनमिषत्' हें (जगत् उत्पत्ति होण्यापूर्वी) पूर्वी फक्त एक आत्मा होतें. (आत्म्याखेरीज) दुसरें व्यापारवत् असें कांहीं नव्हतें; (ऐतरेय०) आत्मस्वरूपाशिवाय दुसरें कांहीं नव्हतें. पहिल्या सूक्तांत 'अम्भः किमासीत' असा जो प्रश्न विचारला आहे त्याचें उत्तर ह्यांत दिलें आहे. अत्यंत सूक्ष्म, गंभीर व गहन असें स्फुरण होतें कां ? होतें ! आपलेंच आपलें ठिकाणीं निवांत निर्विकल्प असें स्वसंवेदनात्मक स्फुरण होतें. ह्यासच स्वसंवेद्य आत्मरूप म्हणतात. स्वतः स्वतःच्याच ठिकाणीं असणें ह्यासच 'स्वधा' असें म्हणतात. शुद्ध, बुद्ध, प्रिय, पूर्ण निष्प्रपंच आणि निरामय असें हें स्वरूप आहे. सांख्य, न्याय व वेदान्त दर्शनें निर्माण होण्यास ही आनीदवातऽ स्वधा कारणीभूत आहे. ह्या दर्शनांनीं मानवाचें कल्याणच झालें आहे. हीं सर्व दर्शनें आपआपल्यापरी बरोबर आहेत. भेद जो दिसतो तो लाक्षणिक आहे. मूळ तत्त्वाशीं नाहीं. सर्व दर्शनें मनुष्यमात्रांना मूळ वस्तूकडेच नेणारी आहेत. मार्ग भिन्न आहेत पण ध्येय एकच आहे. सर्व ज्ञानी व विद्वान आहेत. कोणामध्येंहि न्यूनाधिक्य नाहीं. सर्व अनुभवी आहेत. तीन्ही दर्शनकारांनीं आपला वेगवेगळा आत्मा मानिला आहे. आत्म्याचें

तीन प्रकार शास्त्रामध्यें प्रसिद्ध आहेत. आत्म्यालाच पुरुष म्हणतात. ते भेद असेः– क्षर, अक्षर, आणि अव्यय (पुरुषोत्तम). आत्म्याच्या ह्या तीन भेदामधून या तीन दर्शनकारांनी क्रमशः एक एक भेदाचा मुख्यतः स्वीकार केला आहे. वैशेषिकन्यायदर्शनानें 'क्षर' पुरुषाचा फक्त प्राधान्यानें विचार केला, सांख्यदर्शनानें 'अक्षर' पुरुषाचा विचार केला व शारिरक दर्शनानें, ज्याला वेदांत दर्शन म्हणतात त्यानें, 'अव्यय' आत्म्याचा विचार केला आहे. पहिला सर्व विकाराचें उपादान, परिणामी व अव्यक्त आहे. दुसरा कुंभारा-प्रमाणें निर्माण करणारा अंतर्यामी, नियन्ता, निर्विकार अपरिणामी व अव्यक्त आहे. तिसरा कार्यकारणांतीत, असंग व अव्यक्त आहे. पहिला क्षर पुरुष, दुसरा अक्षर व तिसरा अव्यय पुरुष आहे.

हीं तीन्हीं दर्शनें आपापल्या सिद्धांतांना चिकटून आहेत. आपआपल्या दर्शनांचा त्यांना पूर्ण अभिमान आहे. आपलीं मतें सोडण्यास तीं तयार नाहींत. ह्यांतच त्यांचें वैशिष्ट्य आहे. त्या त्या अवस्थेंतील साधकांना तसेंच सांगावयास पाहिजे, नाहींतर त्यांचा बुद्धिभेद होईल.

'न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।
जोषयेत्सर्व कर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥
— गीता

कर्माच्या ठिकाणीं आसक्त झालेल्या अडाणी लोकांच्या बुद्धीचा ज्ञानी पुरुषानें भेद करूं नये. आपण स्वतः योगयुक्त व सर्व कर्मे करणारा होवून लोकांना तीं खुशीनें करावयास लावावें.

'जे सायासे स्तन सेवीं । तें पक्वानें केवि जेवी ।
म्हणोनि बालका जैसी नेदावी । धनुर्धरा ॥
तैसीं कर्मी जया अयोग्यता । तयाप्रति नैष्कर्म्यता ।
न प्रगटवावी खेळता । आदि करुनि ॥
तेथ सत्क्रियाचि लावावी । हेचि एक प्रशंसावी ।
निष्कर्मीहि दावावी । आचरोनि ॥
तया लोकसंग्रहालागी । वर्तता कर्मसंगी ।
तो कर्मबंध आंगीं । वाजेल ना ॥ — श्री ज्ञानेश्वरी

द्वैत, अद्वैत, द्वैताद्वैत, शुद्धाद्वैत वगैरे वादी आचार्य आपापल्यापरी अगदीं योग्य मार्गावर आहेत. व आपल्या मतांची संपादणी त्यांना तशीच करावयास पाहिजे.

'जैसी बहुरुपियांची रावोराणी ।
स्त्रीपुरुषभाव नाही मनीं ।
परि लोकसंपादणीं । तैसीच करिती ॥'

"शंकरस्वामी ग्यान सिखायो, रामानुज परपत्ति ।
विष्णुस्वामी सेवा-पूजा, निंबारक आसक्ति ।
सेवक-सेयभाव बतलायो मधुकर कैरवचंद ।
रामनामको भजन सिखायो स्वामी रामानंद ॥"
जो ग्रंथकर्ता चाहत स्वमत स्थापन ।
शास्त्रको सरलार्थ नही होय ज्ञापन ।
मीमांसक कहे ईश्वर है कर्मअंग ।
सांख्य कहे जग होत प्रकृतिके संग !
न्याय परमाणुसो ही विश्व होत मानै ।
मायावादी निर्विशेष ब्रह्मै हेतु जानै ।
परम कारण ईश कोइ नही मंडै ।
स्वमतस्थापन हेतु परमत खंडै ॥
अतः छय दर्शनसौ तत्त्व नही ज्ञान ।
महापुरुष जो कहै सोई सत्प्रमान ॥

ह्या मतमतांतरावर पुष्कळ विद्वत्ताप्रचुर ग्रंथ विद्वा-नांनी लिहिले आहेत; व त्यांत त्या त्या मतांची उत्तम मांडणी केली असल्यामुळें ह्या छोट्याश्या लेखांत त्याचा मी तात्पुरता परामर्श घेतला आहे; कारण आपला विषय 'नासदीय सूक्त' आहे व त्यांत ह्या दर्शनांचा किंवा निरनिराळ्या मतांचा विशेषसा संबंध येत नसल्यामुळें जातां जातां ह्या दर्शनांचा उगम कोठें आहे ह्याचा मी उलगडा केला आहे.








श्री. गणेश ल. चदावरकर

# महाराष्ट्र धर्म

## महाराष्ट्र धर्माचे विविध अर्थ

किर्लोस्कर मासिकाच्या ' महाराष्ट्र राज्य ' विशेषांकांत श्री. ना. ग. गोरे यांनीं ' महाराष्ट्राचा नवा धर्म ' या विषयावर जो लेख लिहिला आहे त्या लेखाच्या सुरुवातीस ते म्हणतात—

" महाराष्ट्र धर्म हा शब्द रामदासस्वामींनीं कोणत्या अर्थी वापरला होता आणि तदनंतरच्या काळांत त्या शब्दाचा वापर करणाऱ्यांच्या मनांत नेमका कोणता अर्थ अभिप्रेत होता हें कळण्यास मार्ग नाहीं. कांहीं विद्वानांचें म्हणणें असें आहे कीं, हिंदु धर्म या अर्थीच तो शब्द वापरला जाई, तर कांहींचें म्हणणें असें कीं त्या शब्दांतील आशय अधिक व्यापक व खोल होता. "

महाराष्ट्र धर्म या शब्दाचा अर्थ लावण्याच्या वादांत न शिरतां ते पुढें म्हणतात--

" विसाव्या शतकांत नांदणाऱ्या मराठी माणसांची जीवनदृष्टि अथवा जीवन निष्ठा कोणती असावी तें स्थूलमानानें दर्शविणारा शब्द या अर्थी मी महाराष्ट्र धर्म हा शब्द या लेखांत वापरीत आहे. "

प. वा. न्यायमूर्ति माधवराव रानडे यांनीं आपल्या ' मराठी सत्तेचा उदय ' ( Rise of The Maratha Power ) या ग्रंथांत ' महाराष्ट्रांतील साधुसंत ' ( The Saints and the Prophets of maharashtra ) या विषयावर अत्यंत वाचनीय व विचारप्रवर्तक प्रकरण लिहिलें आहे. श्रीरामदासस्वामींनीं छत्रपति संभाजीला जें उपदेशपर पत्र लिहिलें त्याचा उल्लेख करून त्यांतील ' मराठा तितुका मिळवावा ' व ' महाराष्ट्र धर्म वाढवावा ' या दोन वचनांचा त्यांनीं त्या प्रकरणात विस्तारानें विचार केला आहे.

" पहिल्या उपदेशांतील मुख्य आशय शिवाजी महाराजांच्या नेतृत्वाखालीं परिणतावस्थेस पोंचलेली राजकीय चळवळ हा होता व दुसऱ्यांत तितक्याच स्पष्टतेनें त्यावेळीं देशांत सर्वत्र चालू असलेला, व राजकीय चळवळ ही ज्याचें केवळ प्रतिबिंब होती तो, धार्मिक विकास होता. "

( The first advice represents the leading feature of the political movement which assumed its final shape under Shivaji's leadership, and the second points no less clearly to the religious development which was at the same time going on all over the country, and of which the political movement was itself only reflection. )

न्या. रानडे याच्यापुढेंहि रामदासस्वामींनीं महाराष्ट्र-धर्म हा शब्द कोणत्या अर्थी वापरला होता हा प्रश्न होता. रामदासस्वामींनीं संभाजीला वैदिक धर्म किंवा पौराणिक धर्म किंवा हिंदुधर्म वाढवावा असा उपदेश न करतां महाराष्ट्राचा धर्म वाढवावा असाच उपदेश केला. या गोष्टीचा विचार करून न्या. रानडे यांनीं असा निष्कर्ष काढिला कीं, महाराष्ट्रांतील त्यावेळच्या धार्मिक जागृतीचा व राजकीय उठावाचा अत्यंत निकट असा संबंध असल्यामुळेंच रामदासस्वामींना ' महाराष्ट्र धर्म वाढवावा ' हाच एक उपाय लोककल्याणार्थ संभाजी राजांना सुचविणें योग्य वाटलें. संभाजी महाराजांचे हातून घडलेल्या अनेक कृत्यांचा राज्यव्यवस्थेवर व लोकहितावर कोणता परिणाम







होत आहे हें पाहूनच महाराष्ट्र धर्म वाढविण्याचा उपाय श्री समर्थांना सुचला व तोच त्यांनीं संभाजी राजांपुढें ठेविला. न्या. रानड्यांनीं दर्शविल्याप्रमाणें हा महाराष्ट्र धर्म त्यावेळच्या महाराष्ट्रीय संतांनीं केलेल्या धर्मजागृतीच्या कार्याचा गाभा होता. या धर्मजागृतीचा पाया "रोजच्या जीवनांत परमेश्वराचें अंत:करणांतील अस्तित्व जाणून व त्याचा अनुभव घेऊन वागणें हा होता, व महाराष्ट्रीय संतांचें अत्यंत गौरवास्पद कार्य हेंच असून जिचें मूल्य-मापन कधीं करतां येणार नाहीं ती शांति प्राप्त करून घेण्याचें एकमेव साधन म्हणून महाराष्ट्रांतील लोकांनीं याच धर्मभावनेचें जतन करून ठेविलें आहे"– हा होता, असें न्या. रानड्यांनीं आपल्या लेखांत प्रति-पादिलें आहे.

( All the love......has been in India freely poured upon the intense realisation of the everyday presence of the Supreme God in heart in a way more convincing than eyes or ears or the sense of touch can realise. This constitutes the glory of the saints, and it is a possession which is treasured up by our people, high and low; men women, as solace in life beyond all value. )

## संतांची प्रवृत्तिपर जीवनदृष्टि व महाराष्ट्रधर्म

महाराष्ट्र धर्म हा शब्द श्री समर्थ रामदासस्वामींनीं ज्याअर्थी वापरला होता त्याचअर्थी तो वापरला जावा व आजहि नव्या महाराष्ट्र राज्यांतील लोकांच्या कल्याणाचा व सर्वांगीण विकासाचा विचार करतांना हाच अर्थ घ्यावा हें योग्य आहे. न्या. रानडे यांनीं दर्शविल्याप्रमाणें महाराष्ट्र धर्माचें मूळ बीज महाराष्ट्रीय साधुसंतांनीं प्रतिपादिलेल्या भक्तिमार्गांत आहे. भक्तिमार्ग हा शब्द येथें योजिलेला पाहातांच कांहीं लोकांच्या मनांत अनेक शंका व आक्षेप उठतील. या शंकाच्या व आपक्षोंच्या निरसनार्थ हें सांगणें जरूरीचें आहे कीं, महाराष्ट्रीय साधुसंतांपैकीं कांहींनी एखाद्यावेळीं निवृत्तिपर भक्तिमार्गाचा पुरस्कार केला हें खरें असलें तरी त्यांचा सर्वसाधारण व स्पष्ट रोंख प्रवृत्तिपर जीवनदृष्टीकडेच होता. तुकारामबुवांचा हा अभंग पहा––

काय ते विरक्ति न कळेचि आम्हां। जाणों एका नामा विठोबाच्या ॥ १ ॥ नाचेन मीं सुखें संताचिये मेळीं। दिंडी टाळघोळीं आनंदें या ॥ २ ॥ कासया उदास होऊं देहावरीं । अमृतसागरीं बुडोनियां ॥ ३ ॥ कासया एकांत सेवूं तया वना। आनंद या जनांमाजीं असे ॥ ४ ॥ तुका म्हणे मज आहे हा भरंवसा। विठ्ठल सरिसा चालतसे ॥ ५ ॥

शिवाजी महाराजांनीं पाठविलेला नजराणा तुकारामबुवांनीं परत केला, किंवा शिवाजी महाराजांनीं आपलें राज्य श्री रामदासस्वामींच्या पायांवर ठेविलें असतां त्यांनीं त्याचा स्वीकार केला नाहीं या व अशाप्रकारच्या प्रसंगांवरून ते संत व इतर साधुसंतहि संसाराचे बाबतींत विरक्त होते असा ग्रह होणें स्वाभाविक आहे. बहुतेक सर्व महाराष्ट्रीय साधुसंत विरक्त वृत्तीचे होते, तरी त्यांनीं लोकांना संसाराचा त्याग करा किंवा विरक्तीचा मार्ग धरा असा उपदेश केला नाहीं. परंतु सर्व साधुसंत विरक्त होते असें मानणेंहि बरोबर होणार नाहीं. श्रीसमर्थ रामदासस्वामी वगळल्यास, तुकाराम, एकनाथ, नामदेव वगैरे सर्व महाराष्ट्रीय संत गृहस्थाश्रमीच होते. त्यांच्या वृत्तींत व रहाणींत जी विरक्ति दिसून आली ती त्यांना त्यांच्या स्वीकृत जीवनकार्यामुळें प्राप्त झाली होती; किंबहुना ज्या व्यक्तींना आपल्या संसारापेक्षां अनेक पटींनीं विस्तृत अशा क्षेत्रांत लोककल्याणाचें कार्य करावयाचें असतें, त्यांना इतर सामान्य जनांच्या मानानें वैयक्तिक संसाराविषयीं विरक्त राहाणें क्रमप्राप्त होतें. 'ये मऱ्हाठियेचिया नगरीं' 'ब्रह्मविद्येचा सुकाळु' व्हावा एतदर्थ लोकांना भगवद्गीता मराठींत

समजावून देणारे श्री ज्ञानेश्वर महाराज व 'आधीं प्रपंच करावा नेटका । मग ध्यावे परमार्थ विवेका ।' असा प्रवृत्तिपर उपदेश करणारे रामदासस्वामी या दोघांच्या जीवनदृष्टींत तत्त्वतः फरक नाहीं 'आधीं प्रपंच करावा नेटका' असें ज्यांनीं सांगितलें त्याच रामदास्वामींनीं 'जगदीशापरता लाभ नाहीं । कार्याकारण सर्व कांहीं । संसार करीत असतांही । समाधान ।। हा जीवनांतील श्रेष्ठ धडा आपल्या शिष्यांस शिकविला. 'एक एका साह्य करूं । अवघे धरूं सुपंथ' असा संकल्प लोकांपुढें ठेवणारे तुकाराम-बुवा व "अवघे हातोहातीं तरों भवसिंधु । आवडी सुखकंदु गाऊं गीतीं ॥ हिताचिया गोष्टी सांगूं एकमेकां। शोक मोह दुःखा निरसूं तेणें ॥ एकमेकां करुं सदा सावधान । नामीं अनुसंधान तुटों नेदूं।। घेऊं सर्वभावें हरिनामदीक्षा । विश्वासे सकळिकां हेंचि सांगों ।। " हा उपदेश करणारे नामदेव महाराज हे दोघेहि अत्यंत उदात्त अशा समाजवादाचे किंवा समाज-कल्याण संप्रदायाचे पुरस्कर्ते नव्हते असें कोण म्हणू शकेल ? तुकारामबुवांसारख्यांनीं वैराग्यबळाचा पुरस्कार केला. परंतु तें वैराग्याचें बळ विवेकासहित असावें असा आग्रह धरिला. रामदासस्वामींनीं विवेक-हीन वैराग्यामुळें कोणते परिणाम होतात हें पुढील ओंव्यांत सांगितलें आहे.

महद्भाग्य हातासी आलें । परंतु भोगूं नाहीं जाणितलें।
तैसें वैराग्य उत्पन्न जालें । परी विवेक नाहीं ॥
आदळतें आफळतें । कष्टी होते दुःखी होतें ।
ऐकतें देखतें येतें । वैराग्य तेणें ॥

वैराग्य आणि विवेक यांची सांगड घातली असतां मानवाच्या आयुष्यांत 'जैसें मुखें ज्ञान बोले। तैसीच सवें क्रियाचोल ॥ ' ही उच्च स्थिति निर्माण होते. आज महाराष्ट्रीयांत विवेकहीन वैराग्याचा सुकाळ झाल्याचें जिकडे तिकडे दिसून येतें. संसारांत ओढवलेल्या एखाद्या आपत्तीमुळें किंवा निराशेचा आघात झाल्यामुळें उद्विग्न अशा मनःस्थितींत एखाद्या आधुनिक गुरूच्या संप्रदायांत प्रविष्ट होणारीं माणसें महाराष्ट्रांत हजारोंनीं मोजतां येतील. त्यांच्या अंतःकरणास दुःखामुळें किंवा नैराश्यामुळें जें वैराग्य प्राप्त होतें त्या वैराग्यामुळें त्यांच्या मनांतील स्वार्थ, दंभ, अहंकार, क्रोध, द्वेष इत्यादि विकारांची तीव्रता कमी होते असें सहसा आढळून येत नाहीं. एखाद्या गुरुच्या संप्रदायांत प्रविष्ट होणारे लोक वैराग्यामुळें तसें करतात किंवा ऐहिक सुखाच्या वा उत्कर्षाच्या प्राप्तीची हांव मनांत बाळगूनहि. या धर्माचरणाच्या प्रकारांत विवेक बहुधा नसतोच, पण खरा भक्तिभावहि असतो कीं नाहीं याची वानवा आहे. ही वस्तुस्थिति उद्वेग-जनक आहे. महाराष्ट्राचे आद्य गुरु ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास यांनीं जो भक्ति-मार्ग लोकांना शिकविला तो स्वार्थ, लोभ इत्यादि विकारांपासून पूर्णपणें अलिप्त आहे, तसेंच संकटें, दुःखें प्राप्त करून निराशा इत्यादिकांशीं झगडण्या-साठीं अवश्य अशी निश्चयीवृत्ति माणसाला देण्याचें सामर्थ्यहि त्यांत आहे. एकदां मंबाजी नांवाच्या एका गोसाव्यानें तुकारामबुवांना त्यांचें शरीर रक्तबंबाळ होईपर्यंत कांठ्यांनीं मारिलें. या प्रसंगीं मनोवृत्ति विचलित होऊं न देतां त्यानीं विठोबाला निग्रहानें सांगितलें—

न सोडीं न सोडीं न सोडीं । विठोबा चरण न सोडीं ।
भलतें जड पडो भारी । जीवावरी अगोज ।।
शतखंड देह शस्त्रधारीं । करिता परी न भीयें ।।
तुका ह्मणे केली आधीं । दृढ बुद्धि सावध ।।

महाराष्ट्र धर्मांत रूढ झालेला भक्तिमार्ग अशा-प्रकारें विवेकप्रधान, व सावध बुद्धीनें युक्त व बलदायी असा आहे. नेटका प्रपंच, आर्थिक उत्कर्ष, धन-धान्यादिकांची समृद्धि, सर्व लोकांचें कल्याण साधण्या-च्या व सर्वांस सारखा न्याय मिळवून देण्याच्या उच्च भूमिकेवरून चालविलेला राज्यकारभार, इत्यादिकांना प्रेरक व मार्गदर्शक होण्याचें सामर्थ्य या महाराष्ट्र











अनुक्रमणिका

धर्मांत व त्यांत सांठविलेल्या अनेक, विविध मूल्यांत आहे. 'सामर्थ्य आहे चळवळीचें' ही संघटनेची व्यवहार नीति ज्या श्री समर्थांनीं सांगितली त्यांनीं त्याच चळवळीस भगवंताचें अधिष्ठान पाहिजे असेंहि निक्षून सांगितलें. तेव्हां त्यांनीं याच भक्तिमार्गाचा पुरस्कार केला.

भगवंताचें किंवा ईश्वराचें अधिष्ठान ज्या धर्मास किंवा धर्मसंस्थेस आहे तोच धर्म किंवा तीच धर्मसंस्था महाराष्ट्रानें स्वीकारण्यास महाराष्ट्रीयांचा सर्वांगीण उत्कर्ष निःसंशय होईल. कारण हें भगवंताचें अधिष्ठान जेथें आहे तेथेंच सत्य, दया, अनुकंपा इत्यादि सद्‌गुणांचें वास्तव्य असतें.

जे का रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुलें ।।
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ।।

तुकारामबुवांच्या या अभंगवाणींत दयाशील किंवा अहिंसाशील जीवनाचें मर्म सांगितलें आहे तेंच भक्तिमार्गाचें वर्म.

## नव्या महाराष्ट्रराज्यांत धर्माचें स्वरूप – नैतिकमूल्यांचा उद्धार

तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं 'नवभारता'च्या मे १९६० च्या अंकांत 'नवभारतांतील महाराष्ट्र राज्य' या विषयावरं जो लेख लिहिला आहे त्यांत त्यांनीं असें प्रतिपादिलें आहे कीं, आजपर्यंत इतिहासांत नैतिक प्रेरणांचें संगोपन धर्मसंस्थेनें केलें आहे. परंतु आधुनिक काळांत परंपरागत धर्मसंस्था ही अनेक कारणांस्तव राज्यसंस्थेपेक्षां दुय्यम व राज्यसंस्थेपासून विलग झालेली अशी संस्था झाली आहे." ज्या धर्मसंस्थेचा उल्लेख शास्त्रीबुवांनीं परंपरागत धर्मसंस्था असा केला आहे ती आधुनिक काळांत राज्यसंस्थेपेक्षां दुय्यम व राज्यसंस्थेपासून विलग झाली याबद्दल कोणाहि समंजस धर्मनिष्ठाला खेद वाटत नाहीं. परंपरागत धर्मसंस्था, म्हणजे ज्या धर्मसंस्थेंत रूढींचा व अर्थशून्य धर्माचारांचा सुळसुळाट झाला आहे अशी धर्मसंस्था, राज्यसंस्थेपासून किंवा लोक समाजांतील इतर कोणत्याहि उपयुक्त संस्थेपासून विलग झाली तरच खऱ्या, डोळस धर्मसमजुतींचा प्रादुर्भाव समाजांत होऊं शकतो. परंपरागतच नव्हे तर कोणतीहि धर्मसंस्था राज्यसंस्थेपासून विलग करणें समंजसपणाचें आहे व या दृष्टीनें भारताच्या नव्या राज्यघटनेनें भारत निधर्मी राष्ट्र ठरविलें हें योग्यच झालें. महाराष्ट्राचा धार्मिक इतिहास फार महत्त्वपूर्ण असल्याची ग्वाही श्री. लक्ष्मणशास्त्री देतात. महाराष्ट्रांतील भागवत धर्माची पुण्याई व त्यानें संपादिलेलें कार्य तितकेंच थोर आहे, व म्हणूनच महाराष्ट्राला योग्य, विशाल जीवनदृष्टि प्राप्त करून देण्यासाठीं त्याची गरज आहे.

शास्त्रीबुवांच्या लेखांतील आणखी एक विधान असें आहे, "नैतिक मूल्यांचा उद्धार व संरक्षण करण्याचें प्राचीन कार्य धर्मसंस्थेच्या कक्षेंतून आतां बाहेर पडलें आहे." या त्यांच्या विधानांतून कांहीं प्रश्न उपस्थित होतात. नैतिक मूल्यांचा उद्धार व संरक्षण करण्याचें कार्य जर आतां धर्मसंस्थेच्या कक्षेंत राहिलें नाहीं, मग तें कार्य आतां कोणीं स्वीकारलें आहे, किंवा कोणत्या संस्थेच्या हातीं गेलें आहे ? धर्मसंस्था म्हणजे पारंपरिक धर्मविचार व धर्माचार असें मानावयाचें असल्यास ज्या आचार-विचारांत पारंपरिक व अंध श्रद्धेशिवाय कांहीं राहिलें नाहीं, ज्या आचार-विचारांना वाडवडिलांपासून चालत आलेलें यापलीकडे महत्त्व नाहीं, ज्यांत अंतःकरणाचें पावित्र्य व मोठेपणा टिकविण्याचें सामर्थ्य नाहीं अशा आचार-विचारांच्या कक्षेंतून नैतिक मूल्यांचा उद्धार व संरक्षण करण्याचें कार्य बाहेर पडलें आहे असें म्हणणें बरोबर होईल. पण महाराष्ट्रीय साधुसंतांनीं सांगितलेल्या महाराष्ट्रधर्माचें स्वरूप फार निराळें आहे.

आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्या भटा झाली धणी ।।
अंतरीं पापाच्या कोडी । वरिवरि बोडी होई दाढी ।।

समजावून देणारे श्री ज्ञानेश्वर महाराज व 'आधीं प्रपंच करावा नेटका। मग ध्यावे परमार्थ विवेका।' असा प्रवृत्तिपर उपदेश करणारे रामदासस्वामी या दोघांच्या जीवनदृष्टींत तत्त्वतः फरक नाहीं 'आधीं प्रपंच करावा नेटका' असें ज्यांनीं सांगितलें त्याच रामदास्वामींनीं 'जगदीशापरता लाभ नाहीं। कार्याकारण सर्व कांहीं। संसार करीत असतांही। समाधान ॥ हा जीवनांतील श्रेष्ठ धडा आपल्या शिष्यांस शिकविला. 'एक एका साह्य करूं। अवघे धरूं सुपंथ' असा संकल्प लोकांपुढें ठेवणारे तुकारामबुवा व "अवघे हातोहातीं तरों भवसिंधु। आवडी सुखकंदु गाऊं गीतीं ॥ हिताचिया गोष्टी सांगूं एकमेकां। शोक मोह दुःखा निरसूं तेणें ॥ एकमेकां करुं सदा सावधान। नामीं अनुसंधान तुटों नेदूं॥ घेऊं सर्वभावें हरिनामदीक्षा। विश्वासे सकळिकां हेंचि सांगों ॥" हा उपदेश करणारे नामदेव महाराज हे दोघेहि अत्यंत उदात्त अशा समाजवादाचे किंवा समाजकल्याण सांप्रदायाचे पुरस्कर्ते नव्हते असें कोण म्हणूं शकेल ! तुकारामबुवांसारख्यांनीं वैराग्यबळाचा पुरस्कार केला. परंतु तें वैराग्याचें बळ विवेकासहित असावें असा आग्रह धरिला. रामदासस्वामींनीं विवेकहीन वैराग्यामुळें कोणते परिणाम होतात हें पुढील ओंव्यांत सांगितलें आहे.

महद्भाग्य हातासी आलें। परंतु भोगूं नाहीं जाणितलें।
तैसें वैराग्य उत्पन्न जालें। परी विवेक नाहीं ॥
आदळतें आफळतें। कष्टी होते दुःखी होतें।
ऐकतें देखतें येतें। वैराग्य तेणें ॥

वैराग्य आणि विवेक यांची सांगड घातली असतां मानवाच्या आयुष्यांत 'जैसें मुखें ज्ञान बोले। तैसीच सर्वे क्रियाचोल ॥' ही उच्च स्थिति निर्माण होते. आज महाराष्ट्रीयांत विवेकहीन वैराग्याचा सुकाळ झाल्याचें जिकडे तिकडे दिसून येतें. संसारांत ओढवलेल्या एखाद्या आपत्तीमुळें किंवा निराशेचा आघात झाल्यामुळें उद्विग्न अशा मनःस्थितींत एखाद्या आधुनिक गुरूच्या सांप्रदायांत प्रविष्ट होणारीं माणसें महाराष्ट्रांत हजारोंनीं मोजतां येतील. त्यांच्या अंतःकरणास दुःखामुळें किंवा नैराश्यामुळें जें वैराग्य प्राप्त होतें त्या वैराग्यामुळें त्यांच्या मनांतील स्वार्थ, दंभ, अहंकार, क्रोध, द्वेष इत्यादि विकारांची तीव्रता कमी होते असें सहसा आढळून येत नाहीं. एखाद्या गुरुच्या सांप्रदायांत प्रविष्ट होणारे लोक वैराग्यामुळें तसें करतात किंवा ऐहिक सुखाच्या वा उत्कर्षाच्या प्राप्तीची हांव मनांत बाळगूनहि. या धर्माचरणाच्या प्रकारांत विवेक बहुधा नसतोच, पण खरा भक्तिभावहि असतो कीं नाहीं याची वानवा आहे. ही वस्तुस्थिति उद्वेगजनक आहे. महाराष्ट्राचे आद्य गुरु ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास यांनीं जो भक्तिमार्ग लोकांना शिकविला तो स्वार्थ, लोभ इत्यादि विकारांपासून पूर्णपणें अलिप्त आहे, तसेंच संकटें, दुःखें प्राप्त करून निराशा इत्यादिकांशीं झगडण्यासाठीं अवश्य अशी निश्चयीवृत्ति माणसाला देण्याचें सामर्थ्यहि त्यांत आहे. एकदां मंबाजी नांवाच्या एका गोसाव्यानें तुकारामबुवांना त्यांचें शरीर रक्तबंबाळ होईपर्यंत कांठ्यांनीं मारिलें. या प्रसंगीं मनोवृत्ति विचलित होऊं न देतां त्यानीं विठोबाला निग्रहानें सांगितलें—

न सोडीं न सोडीं न सोडीं। विठोबा चरण न सोडीं।
भलतें जड पडो भारी। जीवावरी अगोज ॥
शतखंड देह शस्त्रधारीं। करिता परी न भीयें ॥
तुका ह्मणे केली आधीं। दृढ बुद्धि सावध ॥

महाराष्ट्र धर्मांत रूढ झालेला भक्तिमार्ग अशाप्रकारें विवेकप्रधान, व सावध बुद्धीनें युक्त व बलदायी असा आहे. नेटका प्रपंच, आर्थिक उत्कर्ष, धनधान्यादिकांची समृद्धि, सर्व लोकांचें कल्याण साधण्याच्या व सर्वांस सारखा न्याय मिळवून देण्याच्या उच्च भूमिकेवरून चालविलेला राज्यकारभार, इत्यादिकांना प्रेरक व मार्गदर्शक होण्याचें सामर्थ्य या महाराष्ट्र

धर्मांत व त्यांत सांठविलेल्या अनेक, विविध मूल्यांत आहे. ' सामर्थ्य आहे चळवळीचें ' ही संघटनेची व्यवहार नीति ज्या श्री समर्थांनीं सांगितली त्यांनीं त्याच चळवळीस भगवंताचें अधिष्ठान पाहिजे असेंहि निक्षून सांगितलें. तेव्हां त्यांनीं याच भक्तिमार्गाचा पुरस्कार केला.

भगवंताचें किंवा ईश्वराचें अधिष्ठान ज्या धर्मास किंवा धर्मसंस्थेस आहे तोच धर्म किंवा तीच धर्मसंस्था महाराष्ट्रानें स्वीकारण्यास महाराष्ट्रीयांचा सर्वांगीण उत्कर्ष निःसंशय होईल. कारण हें भगवंताचें अधिष्ठान जेथें आहे तेथेंच सत्य, दया, अनुकंपा इत्यादि सद्गुणांचें वास्तव्य असतें.

जे का रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुलें ।।
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ।।

तुकारामबुवांच्या या अभंगवाणींत दयाशील किंवा अहिंसाशील जीवनाचें मर्म सांगितलें आहे तेंच भक्तिमार्गाचें वर्म.

### नव्या महाराष्ट्रराज्यांत धर्माचें स्वरूप – नैतिकमूल्यांचा उद्धार

तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं ' नवभारता'च्या मे १९६० च्या अंकांत 'नवभारतांतील महाराष्ट्र राज्य ' या विषयावर जो लेख लिहिला आहे त्यांत त्यांनीं असें प्रतिपादिलें आहे कीं, आजपर्यंत इतिहासांत नैतिक प्रेरणांचें संगोपन धर्मसंस्थेनें केलें आहे. परंतु आधुनिक काळांत परंपरागत धर्मसंस्था ही अनेक कारणांस्तव राज्यसंस्थेपेक्षां दुय्यम व राज्यसंस्थेपासून विलग झालेली अशी संस्था झाली आहे. " ज्या धर्मसंस्थेचा उल्लेख शास्त्रीबुवांनीं परंपरागत धर्मसंस्था असा केला आहे ती आधुनिक काळांत राज्यसंस्थेपेक्षां दुय्यम व राज्यसंस्थेपासून विलग झाली याबद्दल कोणाहि समंजस धर्मनिष्ठाला खेद वाटत नाहीं. परंपरागत धर्मसंस्था, म्हणजे ज्या धर्मसंस्थेंत रूढींचा व अर्थशून्य धर्माचारांचा सुळसुळाट झाला आहे अशी धर्मसंस्था, राज्यसंस्थेपासून किंवा लोक समाजांतील इतर कोणत्याहि उपयुक्त संस्थेपासून विलग झाली तरच खऱ्या, डोळस धर्मसमजुतींचा प्रादुर्भाव समाजांत होऊं शकतो. परंपरागतच नव्हे तर कोणतीहि धर्मसंस्था राज्यसंस्थेपासून विलग करणें समंजसपणाचें आहे व या दृष्टीनें भारताच्या नव्या राज्यघटनेनें भारत निधर्मी राष्ट्र ठरविलें हें योग्यच झालें. महाराष्ट्राचा धार्मिक इतिहास फार महत्त्वपूर्ण असल्याची ग्वाही श्री. लक्ष्मणशास्त्री देतात. महाराष्ट्रांतील भागवत धर्माची पुण्याई व त्यानें संपादिलेलें कार्य तितकेंच थोर आहे, व म्हणूनच महाराष्ट्राला योग्य, विशाल जीवनदृष्टि प्राप्त करून देण्यासाठीं त्याची गरज आहे.

शास्त्रीबुवांच्या लेखांतील आणखी एक विधान असें आहे, " नैतिक मूल्यांचा उद्धार व संरक्षण करण्याचें प्राचीन कार्य धर्मसंस्थेच्या कक्षेंतून आतां बाहेर पडलें आहे. " या त्यांच्या विधानांतून कांहीं प्रश्न उपस्थित होतात. नैतिक मूल्यांचा उद्धार व संरक्षण करण्याचें कार्य जर आतां धर्मसंस्थेच्या कक्षेंत राहिलें नाहीं, मग तें कार्य आतां कोणीं स्वीकारलें आहे, किंवा कोणत्या संस्थेच्या हातीं गेलें आहे ? धर्मसंस्था म्हणजे पारंपरिक धर्मविचार व धर्माचार असें मानावयाचें असल्यास ज्या आचार-विचारांत पारंपरिक व अंध श्रद्धेशिवाय कांहीं राहिलें नाहीं, ज्या आचार-विचारांना वाडवडिलांपासून चालत आलेलें यांपलीकडे महत्त्व नाहीं, ज्यांत अंतःकरणाचें पावित्र्य व मोठेपणा टिकविण्याचें सामर्थ्य नाहीं अशा आचार-विचारांच्या कक्षेंतून नैतिक मूल्यांचा उद्धार व संरक्षण करण्याचें कार्य बाहेर पडलें आहे असें म्हणणें बरोबर होईल. पण महाराष्ट्रीय साधुसंतांनीं सांगितलेल्या महाराष्ट्रधर्माचें स्वरूप फार निराळें आहे.

आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्या भटा झाली धणी ।।
अंतरीं पापाच्या कोडी । वरिवरि बोडी होई दाढी ।।








बोडीलें तें निघालें । काय पालटलें अवगुण ॥
भक्तिभावें वीण । तुका म्हणे अवघा सीण ॥

तुकारामबुवांची ही स्पष्टोक्ति पूर्ण निषेधवाणी बहुतेक सर्व साधुसंतांच्या उपदेशांत आढळून येते.

नैतिक मूल्यांचा उद्धार व संरक्षण करण्याचें कार्य ज्या भागवतधर्मानें केलें त्याचें स्वरूप तुकाराम-बुवांनीं पुढील सुप्रसिद्ध अभंगांत वर्णिलें आहे.

विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म ।
भेदाभेद भ्रम अमंगला ॥
आइकाजी तुम्ही भक्त भगवंत ।
कराल तें हित सत्य करा ॥
कोणाहि जीवाचा न घडो मत्सर ।
वर्म सर्वेश्वरपूजनाचें ॥
तुका म्हणे एका देहाचे अवयव ।
सुखदुःख जीव भोग पावे ॥

ज्या धर्मसंस्थेंतील सर्वेश्वरपूजनाचें वर्म "कोणाहि जीवाचा न घडो मत्सर" हें सर्वश्रेष्ठ नैतिक मूल्य आहे, त्या धर्मसंस्थेशिवाय इतर कोणत्याहि संस्थेंत नैतिक मूल्यांचा उद्धार व संरक्षण करण्याचें सामर्थ्य नाहीं व धर्मसंस्थेशिवाय इतर कोणतीहि संस्था नव्या महाराष्ट्र राज्यांतील लोकांना नैतिक बाबतींत मार्गदर्शक व प्रेरक होऊं शकत नाहीं. भागवत-धर्मानें ईश्वरीतत्त्व व नैतिक तत्त्व असे दोन निराळे प्रांत मानले नाहींत ही गोष्ट शास्त्रीबुवांसारख्या विचारवंत मार्गदर्शकांनीं लक्षांत ठेवणें व महाराष्ट्रीय जनतेच्या नजरेस आणून देणें अगत्याचें आहे. आपल्या विधानाच्या आधारासाठीं शास्त्रीबुवांनीं पुंडलिकाचें उदाहरण दिलें आहे. "देवाच्या जयजयकारामध्यें देवाचा भक्त जो पुंडलीक त्याचा निर्देश अगोदर केला जातो" शास्त्रीबुवा म्हणतात, अशी कथा सांगतात कीं, पुंडलीक हा मातापित-रांच्या सेवेला ईश्वरभक्तीपेक्षांहि श्रेष्ठ समजणारा माणूस होता; म्हणून देव त्याचा शोध करीत आला." या कथेंतील आम्हांला पटणारें मर्म असें आहे कीं, भागवतधर्मांत देवाइतकेंच उच्च स्थान माता, पिता व गुरु यांस आहे. व जे भक्त माता-पितरांना व गुरूला देवासमान मानतात त्यांच्या अंतःकरणांतील भाव आपल्याला पावला असेंच देव मानतो.

### या नीतिकल्पनेपासून ईश्वरस्वरूप अविभाज्य

ईश्वरी तत्त्व म्हणून ज्याचा उल्लेख शास्त्रीबुवांनीं केला आहे व ज्याहून नैतिक तत्त्व त्यांनीं निराळें मानलें आहे त्या ईश्वरी तत्त्वाचें स्वरूप व त्याचें क्षेत्र विश्वव्यापी, किंबहुना विश्वाच्या पलीकडे जाऊन पोंचणारें असें आहे. हें ईश्वरी तत्त्व केवळ ईश्वर-भक्तच प्रमाण मानतात असें नाहीं. भागवतधर्माच्या प्रवर्तकांनीं हा सिद्धांत पुढील शब्दांत मांडला आहे !

माझे देवरायावीण । रितें नाहीं कोठें स्थान ॥
भक्त अभक्तांअंतरीं । पूर्णपणें माझा हरि ॥
भक्तां प्रकाशितो ज्ञान । स्वयें आपुला आपण ॥
अभक्तांचे देहीं राहे । काष्ठीं जेवीं अग्नि राहे ॥
तुका म्हणे निरंतर । वर्तवीत नारीनर ॥

बुद्धिप्रामाण्यवादी ईश्वरीतत्त्व मानोत अगर न मानोत, त्यांच्या अंतःकरणांत सत्य, न्याय, समता, या नैतिक मूल्यांबरोबरच विद्येला शोभणारा विनय, बलवानांचा अलंकार होणारी क्षमाशीलता, मानव-तेचा उच्चतम आदर्श होण्यास जीव व निसर्ग यां-संबंधीं पूज्यभाव, व मानवाचें आध्यात्मिक वैभव कळसापर्यंत नेऊन पोंचविणारी लीनता या नैतिक मूल्यांनाहि स्थान असेल तर तेहि भागवतधर्माचे अनुयायी व भागवतधर्माचें अधिष्ठान जो भगवंत त्याचे पूजक होत. ज्याची कोणत्याहि प्रकारच्या व कितीहि उच्च अशा नैतिक तत्त्वापासून फारकत करतां येत नाहीं असें हें विश्वव्यापी ईश्वरीतत्त्व महाराष्ट्रधर्माचें अधिष्ठान व प्रेरक शक्ति होणें अवश्य आहे. नुसत्या नैतिक मूल्यांचा किंवा नीति-मत्तेचा पुरस्कार करीत राहिल्यानें दंभ किंवा अहं-

कार निर्माण होण्याची जी शक्यता असते ती ईश्वरी तत्त्व प्रमाण मानणाऱ्या धर्मसंस्थेचा पुरस्कार केल्यानें रहाणार नाहीं.

विश्व धर्म, सर्व मानवांना मान्य असणारीं धर्मतत्त्वें किंवा हिंदुधर्म यांपासून महाराष्ट्रधर्म तत्त्वतः निराळा नाहीं, पण स्थलपरत्वें व परिस्थितिपरत्वें कोणती धार्मिक विचारप्रणाली महाराष्ट्रीयांच्या रोजच्या जीवनांत सन्मार्गदर्शक होण्यासारखी आहे व धर्मपालनाचे बाबतींत त्यांनीं कोणतीं ध्येयें नजरेपुढें ठेवणें जरूरीचें आहे, यांसंबंधीं दिग्दर्शन होणें अवश्य आहे. हें दिग्दर्शन सर्व महाराष्ट्रीयांनीं पूज्य मानलेले मराठी भाषेंतील ग्रंथ करूं शकतात. या ग्रंथांपैकीं प्राचीन ग्रंथांत ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, तुकारामाचे अभंग व समर्थांचा दासबोध हे प्रमुख होत. प्रत्येक महाराष्ट्रीयानें या ग्रंथांचें श्रवण, पठण व मनन नित्य केल्यास त्यांना खऱ्या धार्मिकतेची ओळख योग्यप्रकारें होऊन, श्री. ना. ग. गोरे यांनीं म्हटल्याप्रमाणें "मराठी माणसांची जीवनदृष्टि किंवा जीवन निष्ठा कोणती असावी" याचेंहि अचूक ज्ञान होण्यासारखें आहे. नाना देवतांवरील श्रद्धा, मतमतांतरांचा गलबला यांतून वाट काढून खऱ्या धर्मशील जीवनाचा -' कोणाहि जीवाचा न घडो मत्सर, ' किंवा ' एक एका साह्य करूं । अवघे धरूं सुपंथ ' या प्रकारच्या जीवनाचा मार्ग शोधून काढण्यास या ग्रंथांच्या नित्य पठणाचें साहाय्य होईल. पारंपरिक आचारधर्मास अनुसरून महाराष्ट्रीयांची श्रद्धा गणपति, राम, कृष्ण, हनुमान, दत्तात्रेय, मंगेश, शांतादुर्गा इत्यादिकांपैकीं एका देवतेवर पूजे-अर्चेपुरती केंद्रीभूत झालेली असली तरी, संकटप्रसंगीं त्यांना ज्या देवाची आठवण होते तो देवालयांतील देवता नसून सर्व विश्वांस पुरून उरणारा व मानवाचें अंतःकरण ज्याला वास्तव्यासाठीं विशेष प्रिय आहे तो परमात्मा, आत्माराम, हरीच होय. या बाबतींत त्याची श्रद्धा पारखून घेतली असतां तिचें यथार्थ स्वरूप ज्ञानदेवांच्या पुढील अभंगवाणींत व्यक्त झालेल्या श्रद्धेहून निराळें नसल्याचीच प्रचीति येईल:--

हरि येथें रे हरि तेथें रे ।
हरीविण न दिसे रितें रे ॥
हरि आदी रे हरि अंतीं रे ।
हरि व्यापक सर्वांभूतीं रे ॥

या सर्वांभूतीं व्यापक हरीला सर्वांभूतीं कसें पहावें, कसें ओळखावें, व त्यास प्रमाण ठेवून आपलें जीवन हरिमय कसें करावें यासंबंधीं उत्तम शिकवण वर उल्लेखिलेल्या ग्रंथांत सांपडतेच पण हीच शिकवण अधिक सुलभरीत्या समजून घेण्यासाठीं महाराष्ट्रीयांना उपकारक होणारे आधुनिक काळांतील ग्रंथ लोकमान्य टिळकांचें गीतारहस्य, डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर व न्यायमूर्ति माधवराव रानडे यांचीं धार्मिक प्रवचनें, व विनोबाजींचीं गीताप्रवचनें हे होत.



अनुक्रमणिका







श्री. नी. र. वऱ्हाडपाण्डे

# मतें आणि मनोविज्ञान

माझे एक मित्र स्वतःला पुरोगामी म्हणवतात. भारतांत अव्वल दर्जाचें साहित्य व तत्त्वज्ञान कधींच निर्माण झालें नाहीं, हिन्दु समाजाची कोणतीहि रूढि पाश्चात्य रूढींपेक्षां अधिक समर्थनीय नाहीं, विवाहित स्त्रियांना देखील प्रणयस्वातन्त्र्य असावें अशीं त्यांचीं अनेकविध मतें आहेत. हीं मतें प्रतिपादणारी एक लेखमाला देखील त्यांनीं लिहिली. आतां विद्यापीठीय शिक्षण इंग्रजींतूनच द्यावें असें सिद्ध करणारा एक लेख लिहून सनातनी मतांचा विध्वंस करण्याचें माझें कार्य मी पुरें करणार आहें असें ते मला म्हणाले. तेव्हां मी म्हणालों —

"तुमच्या कार्याचा शेवट एका सनातनी मताचें समर्थन करण्यांत होणार तर एकूण."

तुमचें मत चूक आहे असें म्हणण्यापेक्षां तें सनातनी आहे असें म्हणणें माझ्या मित्राला फारच झोंबलें.

"या मताला तुम्ही सनातनी मत कसें म्हणतां ?" त्यांनीं विचारलें.

"सनातनी म्हणजे रूढिप्रिय. विद्यापीठीय शिक्षण इंग्रजीतून आज सुरूं आहेच. रूढ पद्धतीलाच उचलून धरणाऱ्या मताला नवमत कसें म्हणावें ?" मी स्पष्टीकरण केलें. त्यावर ते म्हणाले :

"आज रूढि आहे ती अलीकडे सुरूं झालेली आहे. मातृभाषेंतून शिक्षण द्यावें असें म्हणणारे लोक त्या पूर्वींच्या पद्धतीचें पुनरुज्जीवन करूं पाहत आहेत. म्हणून त्यांचें मत आमच्या मताच्या तुलनेनें सनातनी आहे."

"मग या दृष्टीनें विवाहित स्त्रियांना प्रणयस्वातन्त्र्य असावें हें तुमचें मतदेखील सनातनी आहे. कारण आज तशी रूढि नसली तरी कुन्तीच्या काळीं नियोगाच्या रूपानें ती होती. कुन्तीचीं सारीं मुलें विवाहबाह्य संबंधांतूनच झालेलीं होतीं." मी उत्तरलों.

या उत्तरावर ते काय बोलले हें मला आठवत नाहीं. पण वर दिलेला संवाद माझ्या मित्राच्या विचारपद्धतीचें एक वैशिष्ट्य स्पष्ट करायला पुरेसा आहे. तें म्हणजे आपलीं सर्व मतें नवीन, रूढिभंजक व इरसाल असावीं हा त्यांचा अट्टाहास.

### मतांचीं कुटुंबें

आपण आपलीं मतें बनवतों अशासारखेच कांहींतरी अट्टाहास आपल्या विचारपद्धतींच्या मुळाशीं असतात. मत तर्कशुद्ध व उपलब्ध असलेल्या सर्व पुराव्यावर आधारलेलें असावें, तें सनातनी की सुधारकी हा प्रश्न अप्रस्तुत आहे, ही जाणीवच फार थोड्यांना असते. ही जाणीव ठेवून विचार करणें हाच बुद्धिवाद आहे. पण बुद्धिवादाच्या पातळीवरून विचार करण्याचा प्रयत्न करणाऱ्या लोकांच्या मतावरसुद्धां वरच्यासारख्या बुद्धिबाह्य अट्टाहासांचा प्रभाव पडल्याशिवाय राहत नाहीं. अशा प्रभावांच्या कचाट्यांतून सुटण्याचा प्रयत्न करणें ही एक तपस्या आहे.

मानवाच्या विचारपद्धतीवर प्रभाव गाजवणाऱ्या या दिग्भ्रामक प्रवृत्ति कोणत्या यावर आधुनिक मानसशास्त्रज्ञांनीं जें संशोधन केलेलें आहे त्याची रूपरेषा येथें दाखवणें उद्‌बोधक ठरेल.

अनेक लोकांचीं विविध विषयावरचीं मतें काय आहेत हें पारखण्यासाठीं मानसशास्त्रज्ञांनीं एक मतपत्रिका तयार केली. (१) ज्यू लोक भ्याड असतात, (२) देशांत ज्यू लोकांचें फाजिल वर्चस्व आहे वगैरेसारखीं अनेक विषयावरचीं मतें त्या पत्रिकेंत समाविष्ट केलीं होतीं. ही पत्रिका शेंकडों लोकांना देऊन त्यांत निर्दिष्ट केलेलीं मतें आपल्याला मान्य आहेत कीं अमान्य आहेत हें त्या त्या मतापुढें खुणा करून द्योतित करण्याची सूचना देण्यांत आली. या तऱ्हेनें भरलेल्या सर्व मतपत्रिका गोळा करण्यांत येऊन त्यांचीं सांख्यिकीच्या तंत्रानें तपासणी करण्यांत आली.








हें तन्त्र समजून घेण्यासाठीं वर उल्लेखिलेलींच दोन मतें घेऊं. (१) ज्यू भ्याड असतात, (२) व देशांत ज्यू लोकांचें फाजिल वर्चस्व आहे. या दोन मतांचा कांहींहि नैसर्गिक वा तार्किक सम्बन्ध नाहीं. ज्यू भ्याड असले किंवा नसले तरी त्यांचें वर्चस्व फाजिल असूं शकतें. असें असूनदेखील पहिलें खरें मानणारे बहुसंख्य लोक दुसरेंहि खरें मानतात व पहिलें खोटें मानणारे बहुसंख्य लोक दुसरेंहि खोटें मानतात असें दिसून आलें तर याच्या मुळाशीं ज्यूद्वेष वा ज्यूपक्षपात यासारख्या प्रवृत्ति आहेत असें म्हणतां येतें. ज्यू पक्षपाती लोकांचा ज्यूंच्या विरुद्ध असणारीं सर्व विधानें खोटीं व ज्यूद्वेष्ट्या लोकांचा अशीं सर्व विधानें खरीं असें मानण्याकडे कल असतो. तर्कदृष्ट्या स्वतन्त्र असलेल्या दोन मतांचें साहचर्य जेव्हां फार मोठ्या प्रमाणावर आढळून येतें तेव्हां या साहचर्याच्या मुळाशीं कोणतीतरी तर्कबाह्य भावनिक प्रवृत्ति आहे असें अनुमान निघतें.

धर्म, राजकारण, समाजकारण, साहित्य वगैरे विषयांवरील अशाच तऱ्हेचीं तर्कदृष्ट्या स्वतन्त्र असलेलीं मतें याच रीतीनें तपासून पाहिलीं तर विशिष्ट प्रकारच्या मतांमध्यें साहचर्य असतें व अशा साहचर्यामुळें त्यांचे विशिष्ट गट पडतात असें दिसून येतें.

### चार ध्रुव

हे गट साधारणपणें चार प्रकारचे असतात. (१) रूढिप्रिय मतें, (२) रूढिभंजक मतें, (३) जहाल मतें व (४) मवाळ मतें. हे चार गट म्हणजे विरुद्ध प्रवृत्तींच्या दोन जोड्या आहेत. रूढिप्रियता व रूढिविरोध, जहालपणा व मवाळपणा हीं दक्षिणोत्तर आहेत.

यापैकीं रूढिप्रिय मतें कोणतीं हें मतप्रतिपादक कोणत्या देशांतला व समाजांतला आहे यावर अवलंबून राहील हें उघड आहे. कारण एका देशांत जो आचार सरसहा रूढ आहे. तो दुसऱ्या देशांत अब्रह्मण्यम् समजला जाऊं शकतो. मांसाहाराला विरोध करणें ही आपल्या देशांत रूढिप्रियता समजली जाते. उलट पाश्चात्य देशांत शाकाहाराचा प्रचार करणारे लोक स्वतःला नवमतवादी समजतात. आगरकरांच्या काळीं या देशांत बहुपत्नीकत्वाला विरोध करणें हें नवमतवादाचें एक लक्षण होतें पण ओ ब्रियन नांवाच्या एका इंग्रजी नाटककारानें The Remarkable Mr. Penny Packer या आपल्या नाटकांत इरसाल नवमतवादी म्हणून जो नायक उभा केला आहे. तो बहुपत्नीकत्वाचा आचार व प्रचार करतो! तिशी वा चाळिशीनंतर लग्न करणारे भारतीय स्वतःला अत्याधुनिक समजतात, उलट अमेरिकेंत हायस्कूलमध्यें असतांनाच लग्न करणें हीच ताजी फॅशन आहे. भाण्डवलशाहीचा पुरस्कार करणें हे अमेरिकेंत रूढिप्रियतेचें तर रशियांत रूढिभंजनाचें लक्षण समजण्यांत येईल.

जहाल व मवाळ मतांचें स्वरूप रूढिप्रिय मतांच्या स्वरूपापेक्षां अधिक सार्वत्रिक आहे; कारण जहालपणा कशांत आहे व मवाळपणा कशांत आहे हें देशकालावर अवलंबून नाहीं. जहाल मनुष्याची प्रवृत्ति आपल्या मतांचा आत्यन्तिक आग्रही पुरस्कार, दुसऱ्यांच्या भावनांबद्दल तुच्छताबुद्धि, आपल्या विचारांची अंमलबजावणी करण्यांत बेगुमान दण्डुकेशाही, इत्यादिकांकडे असतें. उलट मवाळ मनुष्याच्या मतांचें स्वरूप "म्हटलं तर असं आहे, म्हटलं तर तसं आहे. पण मला वाटतं असंच आहे," असें असतें. त्या मतांची अंमलबजावणी करण्यांत "पटलं तर घ्या नाहींतर राह्यलं." असेंच धोरण ठेवण्याकडे त्याचा कल असतो. गुन्हेगारांना अद्दल घडवण्यासाठीं असेंच "टांगलें" पाहिजे असें जहालाला वाटेल तर दण्डविधानांत कोणत्याहि गुन्ह्याला प्राणदण्ड नसावा असें मवाळ प्रतिपादन करील. युद्ध करण्यापेक्षां शत्रूला आपल्या देशावर राज्य करूं देणें एखाद्या मवाळाला परवडेल, उलट हरलेल्या शत्रूलादेखील कायमची जरब बसावी म्हणून हिरोशिमा व नागासाकी सारख्या शहरांवर अणुगोल सोडून तीं बेचिराख करणें देखील एखाद्या जहालाला समर्थनीय वाटेल. उद्यांच्या पिढीची बेगमी करण्यासाठीं आजची पिढी गारद झाली तरी जहाल तसें करायला तयार असतो, उलट कुणाचेंहि जीवन दुसऱ्याच्या उत्कर्षाचें केवळ साधन आहे असें मानणें मवाळाला दुःसह असतें.

### चाणक्य आणि एकनाथ

मवाळ आणि जहाल प्रवृत्ति रूढिप्रिय लोकांप्रमाणेंच रूढिभंजकामध्यें देखील असतात. विवाहबाह्य संबंध ठेवणाऱ्यांना चव्हाट्यावर बांधून येत्या-जात्यानें त्यांना दगड मारावे असें जहाल रूढिप्रिय म्हणेल, उलट अशा लोकांनीं प्रायश्चित्त म्हणून ब्राह्मणभोजन घालावें








असें मवाळ रूढिप्रिय म्हणेल. जहाल रूढिभंजक अस्पृष्यता पाळणाऱ्यांना अंदमानांत पाठवायला तयार होईल तर मवाळ रूढिभंजक त्यांना "सनातनी", "प्रतिगामी" वगैरे विशेषणें लावण्यांत समाधान मानील.

जहाल रूढिप्रिय असो कीं रूढिभंजक असो, त्याचा जहालपणा फक्त त्याच्या मतांतच दिसून येतो असें नाहीं. चित्रदर्शनासारख्या मनोवैज्ञानिक कसोट्यांत देखील तो दिसून येतो. चित्रदर्शनाच्या कसोटींत कांहीं अस्पष्ट चित्रें दाखवून त्या चित्रांतील प्रसंगांवर आधारलेली एखादी गोष्ट लिहायला सांगण्यांत येते. अस्पष्ट चित्रें दाखवण्यांत परीक्ष्य व्यक्तीच्या कल्पनाशक्तीला शक्य तितका वाव देण्याचा उद्देश असतो. चित्रांतील प्रसंग अगदीच स्पष्टपणें चित्रिलेला असेल तर सर्वांना त्या चित्रांत तोच प्रसंग दिसेल व कोणता प्रसंग चित्रिलेला आहे यावर कल्पना रचण्याची ज़रूरच उरणार नाहीं. अर्जुन धनुष्य फेकून खिन्नपणें उभा आहे व श्रीकृष्ण त्याला उपदेश करीत आहे असें चित्र दाखवलें तर सर्वच लोक अर्जुनविषादयोगाची गोष्ट लिहितील व अशा गोष्टींवरून ती लिहिणाऱ्यांच्या कल्पना कोणत्या दिशेनें धावतात हें कळायला मार्गच उरणार नाहीं. उलट चित्र शक्य तितकें अस्पष्ट असेल तर त्यांत काय आहे याबद्दल प्रत्येकजण आपली कल्पना लढवील व त्याच्या कल्पनाविश्वाचें वैशिष्ट्य स्पष्ट होईल.

अशा तऱ्हेचीं चित्रें रूढिप्रिय व रूढिभंजक अशा दोन्ही तऱ्हेच्या जहालांना दाखवण्यांत येऊन त्यांना त्यावर गोष्टी लिहिण्यास सांगण्यांत आलें. तुलनेसाठीं जहाल किंवा मवाळ यापैकीं कोणत्याहि विशेषणानें ज्यांच्या मतांचें वर्णन करतां येत नाहीं अशा कांहीं लोकांवरहि हाच प्रयोग करण्यांत आला.

या दोन्ही गटांतील लोकांच्या गोष्टी तपासून पाहतां जहाल गटांतील लोकांच्या गोष्टींत द्वेष, भांडणें सूड व बंडखोरी यांचें साम्राज्य आढळून आलें. या बहुतेक गोष्टी रक्तरंजित होत्या.

अर्थात् जहालपणाचा परिणाम फक्त व्यक्तीच्या मतावरच होतो असें नाहीं. जहालाचें एकूण सर्व कल्पनाविश्वच जहाल असतें. चित्रांतली आकृति एखाद्या शिखाधारी ब्राह्मणासारखी दिसली तर आपल्याला १०८ स्नानांचें पुण्य घडलें म्हणून आपल्यावर १०८ वेळां थुंकणाऱ्याचें आभार मानणाऱ्या एकनाथाचें हें चित्र आहे. असें मवाळाला वाटेल तर जहालाला 'नंदवंशाचा समूळ उच्छेद केल्याशिवाय आपल्या शेंडीची गाठ बांधणार नाहीं" अशी प्रतिज्ञा करणाऱ्या चाणक्याचें त्यांत दर्शन होईल. एका जटाधारी पुरुषापुढें एक स्त्री बसली आहे असें कांहींसें चित्रांत दिसलें तर वाल्मीकि सीतेचें सान्त्वन करीत आहे असें मवाळाला वाटेल तर आपल्याकडे दुर्लक्ष करणाऱ्या शकुन्तलेला दुर्वास शाप देत आहे अशी जहाल कल्पना करील.

### पाव्हलाव्हचा कुत्रा

जहाल व मवाळ यांचा भेद फक्त त्यांच्या विचारपद्धतीपुरताच मर्यादित नाहीं. संधनक्षमतेच्या बाबतींत देखील त्या दोघांत भेद आहे. संधनाला इंग्रजींत conditioning असा शब्द आहे. conditioning म्हणजे विशिष्ट प्रकारच्या नोदनानें stimulus नें होणारी प्रतिक्रिया कालांतरानें त्याच्या साहचर्यानें राहणाऱ्या नोदनानें देखील होणें. उदाहरणार्थ अन्न पाहिल्याबरोबर उपाशी कुत्र्याच्या तोंडातून लाळ गळूं लागते कालांतरानें अन्न मिळण्याच्या पूर्वी नियमानें वाजणाऱ्या घंटेची खणखण ऐकून देखील तो कुत्रा लाळ गाळूं लागतो. कारण अन्न या मूळ नोदकाशी घंटेचें साहचर्य स्थापित झालेलें असतें.

जें कुत्र्याच्या बाबतींत खरें आहे तेंच मानवाच्या बाबतींत देखील खरें आहे. पण मानवावर प्रयोग करतांना लाळेऐवजीं डोळ्यांच्या उघडझांपेचा बहुधां विचार करतात. डोळ्यावर फुंकर घातली म्हणजे माणूस अभावितपणें डोळे मिटतो, पण कालान्तरानें फुंकर न घालतां फुंकरणाऱ्यानें नुसते ओठ हलवले तरी डोळे मिटण्याची क्रिया घडते. अशा तऱ्हेचे प्रयोग करून पाहतां जहाल लोकांपेक्षां मवाळ लोकांच्या ठायीं अशा क्रिया करण्याची प्रवृत्ति अधिक लवकर उत्पन्न होते असें आढळून आलें आहे. म्हणजे जहालापेक्षां मवाळ अधिक सन्धनसुलभ असतात.

पण यावरून जहालापेक्षां मवाळ कोणतीहि नवीन गोष्ट अधिक लवकर शिकतात असें समजणें चुकीचें होईल. सन्धनसुलभता म्हणजे शिक्षणसुलभता नव्हे. योग्य प्रतिक्रिया शिकणें शिक्षणाला जेवढें आवश्यक आहे तेवढेंच अयोग्य प्रतिक्रिया टाळणें देखील







आवश्यक आहे. पोहायला शिकतांना प्रथम पाण्यांत उतरणारा सर्वांगांची धडपड करतो व अर्ध्या मिनिटांत धापा टाकूं लागतो. कालांतरानें या धडपडीपैकीं तरंगण्यासाठीं आवश्यक असलेल्या हालचाली कोणत्या हें अनुभवानें कळतें व पोहणारा तेवढ्याच हालचाली कायम ठेवून बाकीच्या निरर्थक हालचाली करणें सोडून देतो. पोहणारा संधनसुलभ असेल तर आवश्यक हालचाली करणें लवकर शिकेल पण अनावश्यक हालचाली टाकणें त्याला लवकर जमणार नाहीं. उलट तो संधनसुलभ नसेल तर आवश्यक हालचाली उशीरा शिकला तरी अनावश्यक हालचाली लवकर सोडूं शकेल. एकूण संधनसुलभ मनुष्य संधनकठिन मनुष्यापेक्षां लवकर पोहायला शिकेलच असें म्हणतां येत नाहीं.

## अंतर्मुख आणि बहिर्मुख

मवाळ सुसंध व जहाल दुःसंध असतात त्याचप्रमाणें मवाळ अंतर्मुख व जहाल बहिर्मुख असतात असेंहि दिसून आलें आहे. अंतर्मुख मनुष्याला भोवतालच्या जगापेक्षां आपलेच विचार अधिक प्रिय असतात. गाडींत प्रवास करतांना समोर बसलेल्या माणसाशीं तो आपण होऊन बोलत नाहीं. बाहेरच्या वनश्रीकडे चर्मचक्षु वळलेले असले तरी त्याच्या मनश्चक्षूंसमोर त्या वनश्रीच्या ऐवजीं वर्षापूर्वीं भेटलेली एखादी वनिताश्रीच घोळत असते. लहानपणच्या आठवणी काढतांना आपले मास्तर काळे होते कीं गोरे होते, शाळेची इमारत दगडी होती कीं विटांची होती वगैरे गोष्टी त्याला आठवणार नाहींत. "बक्षी मास्तरांच्या तासांत आपला वेळ बरा जात असे, ढोक मास्तरांचा तास मात्र केव्हां संपतो असें आपल्याला होऊन जाई. शाळेच्या पिछाडीकडे विहिरीजवळ चिवडेवाला बसत असे. त्याचा चिवडा किती रुचकर असायचा!" अशा तऱ्हेच्या स्वतःच्या भावनांशीं साक्षात् संबंध असलेल्याच गोष्टी त्याला आठवतात.

उलट बहिर्मुख मनुष्य कुणाशीहि आपण होऊन बोलतो. इतका कीं पाहणाऱ्याला वाटावें यांचा फार जुना स्नेह आहे. रस्त्यावरून चालतांना कोणती इमारत कुठे आहे, कोणता पुतळा कोणत्या वळणावर आहे वगैरे गोष्टीकडे त्याचें पुरेपूर लक्ष असतें. बक्षी मास्तर चष्मा लावत असत व ढोक मास्तरांच्या चेहऱ्यावर तीळ होता वगैरे गोष्टी स्वतःच्या भावनांशी फारसा संबन्ध नसला तरी त्याच्या आठवणींतून सुटत नाहींत.

अन्तर्मुख व बहिर्मुख लोकांच्या मानसिक आजारांमध्यें देखील फरक असतो. अन्तर्मुख मनुष्याचें मानसिक स्वास्थ्य बिघडलें तर त्याला बहुधा चिन्तेचें भूत पछाडतें. "असें केलें तर माझी नोकरी तर जाणार नाहीं, तसें केलें तर मला क्षयरोग तर जडणार नाहीं न् यापैकीं कांहींच न केलें तर माझी बायको तर पळून जाणार नाहीं!" अशा तऱ्हेच्या शेंकडों मनःकल्पित विवंचनांनीं तो ग्रासला जातो. उलट बहिर्मुख मनुष्याचें मनःस्वास्थ्य बिघडलें तर त्याला हिस्टीरिया म्हणजे फेपरें होण्याचा संभव असतो. उद्दाम चिडखोरपणा, रागाचे झटके, स्मृतिभ्रंश वगैरे या रोगाचीं लक्षणें आहेत. बहिर्मुखांच्या रोगाचीं हीं लक्षणें लोकांना सहज दिसूं शकतात. उलट अन्तर्मुखांच्या व्याधि त्यांचा पूर्ण स्फोट झाल्याशिवाय इतरांना कळत नाहींत. तोपर्यन्त ते आंतल्या आंतच जळत असतात.

## देशे देशे मतिर्भिन्ना

अंतर्मुख-बहिर्मुख, सुसन्ध-दुःसन्ध, जहाल-मवाळ या दक्षिणोत्तर प्रवृत्ति एकत्र आढळतात. या प्रवृत्तींहून स्वतन्त्र अशा रूढिप्रिय-रूढिभंजक या दक्षिणोत्तर प्रवृत्ति आहेत. या दोन प्रकारच्या प्रवृत्ति विशिष्ट प्रकारची मतें घडवण्यास कारणीभूत होतात असें आतापर्यन्त प्रतिपादलें. पण आपली मतें बनवतांना सर्व लोकांच्या बाबतींत या सर्व प्रवृत्ति सारख्याच महत्त्वाच्या असतात असें नाहीं. ब्रिटनमधील राजकीय मतप्रणालींचा विचार केला तर त्यांत रूढिप्रियता व रूढिविरोध या प्रवृत्तींच्या आधारेंच मुख्यतः मतांचे तट पडलेले आहेत, जहालपणा व मवाळपणा या बाबतींत निरनिराळ्या मतप्रणालींत फारसा फरक नाहीं, बहुधा सगळे सारखेच मवाळ आहेत असें आढळून येतें. उलट फ्रान्समध्यें रूढिप्रिय व रूढिभंजक यांच्याप्रमाणेंच या दोन्ही गटांत जहाल व मवाळ यांचेंहि प्रमाण फार मोठें आहे. आपल्या देशांतील राजकीय मतप्रणालींत रूढिप्रिय-रूढिविरोधी या भेदांपेक्षां जहाल व मवाळ हेच भेद अधिक प्रभावी आहेत असें म्हणायला हरकत नाहीं.

देशपरत्वें मतांच्या मुळाशीं असलेल्या प्रवृत्तींच्या प्राबल्यांत फरक पडतो, त्याचप्रमाणें त्या प्रवृत्तींच्या



अनुक्रमणिका

स्वरूपांत देखील फरक पडतो. आतांपर्यंत वर्णिलेल्या चार प्रवृत्तींच्या आधारेंच सर्व देशांतील मतप्रणालींची उपपत्ति लावतां येणार नाहीं. उदाहरणार्थ, आपल्या देशांत वरील प्रवृत्तींच्या जोडीलाच पाश्चात्त्य विरुद्ध भारतीय या प्रवृत्तीचा विचार करावा लागेल. ही प्रवृत्ति नवीन विरुद्ध जुनें या प्रवृत्तीपेक्षां वेगळी आहे. कारण पाश्चात्त्य तें नवीन व भारतीय तें जुनें असतेंच असें नाहीं. प्लेटोपेक्षां शङ्कराचार्य अधिक नवे म्हणजे आधुनिक आहेत. असें असूनदेखील " शंकराचार्य प्लेटोच्या जवळपासहि बसूं शकणार नाहींत " असें विधान केलें तर वरील दोन्ही तत्त्ववेत्त्यांबद्दल पूर्ण अज्ञान असून देखील पाश्चात्त्यभक्त माणसाला एक प्रकारचा खवचट आनंद होतो व भारताभिमानी माणसाच्या भावना दुखावतात. यावरून पाश्चात्त्यभक्ति व नवलोलुपता या प्रवृत्ति भिन्न आहेत हें स्पष्ट होतें.

## रूढिप्रियतेची इष्टता

निरनिराळ्या मतप्रणालींच्या मुळाशीं असलेले निरनिराळे प्रकृतिविशेष हे असे असतात. या विशेषांचा मताच्या सत्यासत्यतेशीं कांहीं संबंध नसतो व यामुळें साधारणपणें अशा प्रकृतिविशेषांचा आपल्या विचारांवर परिणाम होऊं देणें इष्ट नसतें. साधारणपणें म्हणण्याचें कारण असें कीं, वैचारिक दृष्ट्या हे विशेष सर्वस्वीं व सर्व परिस्थितींत हानिकारकच असतात असें नाहीं. उदाहरणार्थ कला, विज्ञान व साहित्य या क्षेत्रांत रूढिविषयीं असंतुष्टता व नवीन नवीन तंत्रांचा प्रयोग करण्याची वृत्ति स्पृहणीय असते. कारण नावीन्य व अपूर्व निर्मिति हीं सौंदर्याला व ज्ञानवृद्धीला अत्यंत आवश्यक आहेत. अमुक ग्रंथांत सर्वच ज्ञान साठवून ठेवलें आहे, त्यापलीकडे ज्ञान असूंच शकत नाहीं व अमुक ग्रंथांत साहित्यिक सौंदर्याची परमावधि झाली आहे, त्यापेक्षां वेगळें कुणी लिहिण्याचा प्रयत्न करणें व्यर्थ आहे, अशा प्रकारची वृत्ति ही कलेची व विज्ञानाची इतिश्रीच असते.

उलट समाजव्यवस्थेच्या बाबतींत रूढि भंजनाच्या वृत्तीपेक्षां रूढिप्रियताच एकूण अधिक हितकर असते. कारण " क्ष " रूढीपेक्षां " य " रूढि चांगली असें निर्णायकपणें अनेकवेळां सिद्ध करतां येत नाहीं. समजा क्ष रूढीमध्यें अ हा गुण व आ, इ, उ हे दोष व य रूढीमध्यें क, ख, घ हे गुण व ग हा एकच दोष आहे, असें असलें तरी " क्ष " पेक्षां " य " श्रेष्ठ असें सिद्ध होत नाहीं. कारण " क्ष " मधील एकच गुण " य " मधील तिन्ही गुणांपेक्षां अधिक स्पृहणीय व " य " चा एकच दोष " क्ष "च्या तिन्ही दोषांपेक्षां अधिक त्याज्य असूं शकेल. रूढींतील कोणत्या गुणाचें मूल्य किती हें कोणत्याहि धारवाडी काट्यावर तोलून वस्तुनिष्ठपणें ठरवतां येत नाहीं.

दुसरें असें कीं, " य " रूढि " क्ष " रूढीपेक्षां चांगली असली तरी " क्ष " चा नाश करून तिच्या जागीं " य " ची प्रस्थापना करणें चांगलें ठरेलच असें नाहीं, कारण " क्ष " चा नाश करतांना समाजाला बसणारे धक्के कितपत घातक आहेत, या धक्क्यांमुळें झालेलें नुकसान जमेस धरून देखील समाजाचा अन्तीं फायदा होण्याइतपत " य " रूढि चांगली आहे कीं काय हाहि प्रश्न महत्त्वाचा आहे. रोग बरा करण्यासाठीं शस्त्रक्रिया करावी कीं नाहीं हें शस्त्रक्रिया सहन करून पुनः लवकर पूर्णपणें धडधाकट होण्याइतकें शरीरांत सामर्थ्य आहे कीं नाहीं यावर अवलंबून असतें. रोगापेक्षां शस्त्रक्रियेचेच परिणाम अधिक तापदायक होणार असतील तर शस्त्रक्रियेपेक्षां रोगच बरा असाच सल्ला कोणताहि डॉक्टर देईल.

## स्वाभिमान आणि परपूजन

शस्त्रक्रियेचें उदाहरण जहालपणाच्या बाबतींत देखील लागूं आहे. शस्त्रक्रिया हा जहाल उपाय आहे व औषधपाणी हा मवाळ उपाय आहे. जहालपणापेक्षां मवाळपणा नेहमींच चांगला असें म्हणणें रोग बरा करण्यासाठीं शस्त्रक्रिया कधीं करूंच नये असें म्हणण्यासारखें आहे. जहालपणामुळें होणारे दुष्परिणाम तात्पुरते व सुपरिणाम दीर्घजीवी असतील तर प्राप्त परिस्थितीचे दुष्परिणाम चिरकाल उराशीं बाळगणाऱ्या मवाळपणापेक्षां तो श्रेयस्कर ठरेल.

पण साधारणपणें मानवी व्यवहारांत मवाळपणा अधिक हितकर असतो, कारण अमुक मत सर्वस्वी बरोबर व तमुक सर्वस्वी चूक असें बहुधा घडत नाहीं. जहाल मनुष्याची प्रवृत्ति दुसरी बाजू पाहून आपल्या चुका कबूल करण्याची नसते. चुकीच्या मतांचा पुरस्कार मवाळपणें केल्यानें फारसें नुकसान होत नाहीं. जहालपण व चुकीची विचारसरणी यांची युति मात्र उत्पातकारक असते.



अनुक्रमणिका






मवाळ – जहालासारखेंच भारतीय विरुद्ध पाश्चात्य हे जे दोन ध्रुव विचारसरणीला दिशा दाखवीत असतात त्यांच्यामध्यें एकूण भारतीयत्वाच्या ध्रुवाचीच दिशा अधिक श्रेयस्कर आहे असें मला वाटतें. विज्ञानाच्या निर्णायक कसोट्यांनीं जिथे एखादी भारतीय संस्था तत्तुल्य पाश्चात्य संस्थेपेक्षां वाईट आहे असें सिद्ध करतां येत नाहीं, तिथें ती केवळ भारतीय आहे म्हणून तिचा पुरस्कार करणें गैर नाहीं. देशाच्या परंपरेशीं निगडित असणाऱ्या पृथगात्मक गोष्टींच्या भोंवतीं देशाचें भावजीवन गुंफलें जाऊन त्याला स्थैर्य व एकात्मता प्राप्त होत असते. त्यामुळें देशाचें सांस्कृतिक वैशिष्ट्य टिकवण्याची प्रवृत्ति पाश्चात्यीकरणाच्या प्रवृत्तीपेक्षां अधिक देशहिताची आहे.

शिवाय विजेत्यांबद्दल वाटणारी पूज्यबुद्धि ही भावना घृणास्पद आहे. उलट स्वाभिमान ही भावना उदात्त आहे. म्हणून पाश्चात्यांचें केवळ अनुकरण करण्याच्या बुद्धीनें टाय बांधणाऱ्या माणसापेक्षां भारतीयत्वाच्या अभिमानानें कटाक्षानें शेंडी राखणाऱ्या माणसाबद्दल मला अधिक आदर वाटतो.

स्वाभिमान आंधळा होऊं शकतो तसेंच पाश्चात्याबद्दलची पूज्यबुद्धि देखील आंधळी असूं शकते. पण स्वाभिमानाचा जन्म खऱ्या प्रेमाच्या पोटीं झाला असेल तर तो आंधळा होण्याचा संभव फारच कमी असतो. आपल्या मुलाबद्दल आपल्याला प्रेम वाटतें म्हणूनच त्याची प्रकृति बिघडली कीं काय हें आपण दक्षतेनें पाहत असतो, व रोगाचें थोडेंसें चिन्ह दिसल्याबरोबर उपचार सुरू करायला चुकत नाहीं. रोग आपल्या मुलाचा म्हणून रोगाबद्दलच आपल्याला अभिमान वाटतो व त्यावर आपण उपचार करूं देत नाहीं असें कधीं होत नाहीं. देशावर खरें प्रेम असेल तर देशविघातक प्रवृत्ति कोणत्या इकडे आपण डोळ्यांत तेल घालून पाहूं व आपला देशाभिमान आंधळा होण्याचा संभव उरणार नाहीं.

---





अनुक्रमणिका






## वाचकांचा पत्रव्यवहार –

**श्री. संपादक "नवभारत" यांस**

नवभारताच्या फेब्रुवारी अंकांत 'नवें नवनीत" या काव्यसंग्रहांवर एक परीक्षण आल आहे. ग्रंथ आधींच वाचला होता; व परीक्षण वाचल्यावर त्याला उत्तर देणें जरूर वाटूं लागलें. विशेषतः 'नवें नवनीत' या ग्रंथाचें कार्य माझ्यासमोरच गेलीं दहाबारा वर्षे चालूं होतें, त्यामुळें उत्तर देणें जास्तच जरूरीचें वाटलें.

या ग्रंथाचे उद्देश संपादकीय निवेदनांत स्पष्ट सांगितले आहेत. पण असले मोठे ग्रंथ व त्यांचीं समीक्षणें पाहिलीं तर हे ग्रंथ समग्र वाचण्याची तसदी कोणीच घेत नाहीं हें उघड दिसतें. अभ्यास न करतां वाटेल तीं विधानें केलीं जातात. एका वृत्तपत्रानें समीक्षणांत 'नवें नवनीत' मध्यें चक्रधरस्वामींच्या कविता नाहीत ही एक मोठी उणीव असल्याचें जाहीर करून टाकलें. बिचाऱ्या समीक्षक महाशयांना चक्रधरस्वामी स्वतः कवि नव्हते हें ठाऊकच नव्हतें. पुष्कळ समीक्षकांनीं पोपटासारखी विनोबाजींच्या कांहीं वाक्यांची री ओढली आहे. विनोबाजी कुठल्या भूमिकेवरून काय सांगत आहेत तें त्यांना कळलेलें नसतें व विनोबांनीं उल्लेख केलेल्या कांहीं कवींचीं नांवेंहि त्यांनीं प्रथमच ऐकलेलीं असतात. ग्रंथ व संपादकाचें म्हणणें नीट वाचलें नाहीं तर ग्रंथाचे उद्देश कुठून कळणार? नवभारतच्या समीक्षणकारानाहि हे उद्देश नीट समजले नाहीत अशी माझी तक्रार आहे.

प्रस्तुत काव्यसंग्रहासारखे ग्रंथ त्यांची जशी योजना करावी व त्यांना जसें स्वरूप द्यावें तसें होणार. 'नवें नवनीत' कांहीं विशिष्ट दृष्टिकोन ठेऊन तयार केलें आहे. त्यावर दुसरे दृष्टिकोन लादून कसें चालणार? असें करणें म्हणजे मुंबईहून पुण्याला जाणाऱ्यास वाटेंत नाशिकला कां उतरत नाहीस म्हणून विचारण्यासारखें आहे. ज्यांच्या काव्यसंग्रहाबद्दल निराळ्या कल्पना आहेत त्यांनीं निराळा संग्रह करावा. मला याबद्दल एक विशेष गोष्ट सांगाविशी वाटते. माणसाच्या निरनिराळ्या वयांत साधारणपणें निरनिराळ्या कल्पना असतात. संपादक जेव्हां समीक्षकांच्या वयाचे होते तेव्हां त्यांनी प्रथम केलेल्या काव्यसंग्रहाचें स्वरूप समीक्षकांच्या कल्पनेसारखेंच होतें. पण त्या संग्रहावर अनेक जाणत्या लोकांनीं कोरडे ओढले. कांहींनी तर तो संग्रह गटारांत फेकून द्यावा म्हणून सुचविलें, नंतर दीर्घकाल शेकडो वाचकांच्याबरोबर चर्चा करून व त्यांची मतें लक्षांत घेऊन त्या संग्रहाचें स्वरूप पूर्ण बदलेलें. प्रत्येक व्यक्तीच्या मतांचें चित्र त्यांत उठणें शक्य नाहीं पण बहुसंख्य वाचकांच्या मतांचा विचार केला आहे व त्यास वाव दिला आहे.

मराठी भाषेचा व इतिहासाचा शक्य तितका इतिहास दाखवणें व लोकप्रिय कविता एकत्रित करणें हे 'नवें नवनीत' या ग्रंथाचें प्रमुख उद्देश आहेत.

याशिवाय त्यांत विषयांची व काव्याची विविधताहि दाखविण्याचा यत्न केला आहे. हा ग्रंथ नुसता Golden Treasury वजा नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर ओह. समीक्षकांच्या मनांत गोल्डन ट्रेझरी आहे. त्यामुळें त्यांनी या ग्रंथांत न आलेल्या अनेक आधुनिक कवींची यादी दिली आहे. तींत कांहीं कवि तर असे आहेत कीं ते स्वतःला कवि म्हणवीत नाहीत. अशी आणखी शेकडो कवींची यादी सांगतां येईल. लोकप्रियता मिळविणाऱ्या कविता थोड्या असतात व त्या सर्व घेण्याचा प्रयत्न केला आहे. बाकीच्यांचा ७०० पृष्ठांत समावेश कुठून होणार? बरेचसे समीक्षक ही गोष्ट तर विसरतात, पण आणखी 'नवें नवनीत' हा सर्व मराठी काव्याचा संग्रह आहे हें विसरून फक्त आधुनिक कवितांचा संग्रह जसा होईल तें स्वरूप कां नाहीं म्हणून विचारतात. पुष्कळ समीक्षकांनीं जुनें नवनीत वाचलेलें नसतें व 'नवें नवनीत' वरवर चाळलेलें. त्यामुळें दोहींतला फरक कळलेला नसतो व मग 'नव्या नवनीतानें' काय साधलें असें वाटतें.

असे ग्रंथ नीटपणें करावयास विचारपूर्वक योजना करावी लागते, व त्यांच्या क्षेत्राची मर्यादा ठरवावी लागते. हे ग्रंथ सर्वसंग्राहक होऊं शकत नाहींत. पण आपल्या सर्व देशांत गोंधळालाच योजना समजतात. पद्धतशीर केलेल्या कामाचें स्वरूप न कळलें की, तोच गोंधळ वाटणार. हा काव्यसंग्रह तत्त्वज्ञानाचा नाहीं ही गोष्ट निवेदनांत स्पष्ट सांगितली आहे. मग ज्ञानेश्वर तुकारामांचें तत्त्वज्ञान नाहीं म्हणून तक्रार कशाला? आणि ज्ञानेश्वरीतलें तत्त्वज्ञान चार ओळींनीं काव्यसंग्रहांत








उतरणार आहे कीं काय ? तुकारामांचे उपदेशपर अभंग समीक्षकांना विशेष वाटत नाहींत ! ह्या अभंगांत असलेल्या म्हणी लोकांच्या तोंडी बसून मराठी भाषेचा त्या एक भाग झाल्या आहेत, व तुकारामांचें श्रेष्ठत्व हेंच आहे कीं त्यांचें काव्य समाजाच्या खालच्या थरापर्यंत पोंचलें. ज्ञानेश्वरांचीं प्रसिद्ध वाक्यें व तुकारामांचे तसेच अभंग शक्य तितके ग्रंथांत घेतलें आहेत, समीक्षकांच्या याबद्दलच्या कल्पना चार लोकांच्यापेक्षां निराळ्या आहेत, व आज तीन शतकें भाषेंत चालणारे तुकारामांचे अभंग त्यांना कमी दर्जाचे वाटतात. ही गोष्ट विचित्र आहे.

संपादकीय निवेदनांत पूर्वींच्या काव्यसंग्रहांचें स्वरूप सांगितलें आहे तें स्थूल मानानें सांगितलें आहे. त्यांतील सर्व गोष्टी प्रत्येक काव्यसंग्रहाला लागू पडतील असें मुळीच नाहीं. पण समीक्षक तशी कल्पना करून घेऊन मग सर्व काव्यसंग्रहावर अन्याय झाल्याचें सांगतात. त्यांनीं काव्यवाहिनीचा उल्लेख केला आहे. या काव्यवाहिनीचे संपादकच काय म्हणतात तें खालीं दिलें आहे तें समीक्षकांनीं वाचून पहावें. आतांपर्यंत झालेल्या कुठल्या काव्यसंग्रहांत सर्व मराठी भाषेचा व इतिहासाचा प्रवाह एकत्रित दाखवला गेला असेल किंवा सर्व लोकप्रिय कविता एकत्रित करण्याचा यत्न केला गेला असेल, तर त्या काव्यसंग्रहांचीं नांवें समीक्षकांचीं जरूर सांगतीं.

नेमक्या हव्या त्या कविता गाळल्या असें समीक्षक म्हणतात. प्रश्न असा कीं हव्या कुणाला ? मला समीक्षकांना परत सांगावेसें वाटतें कीं शेकडो सामान्य वाचकांच्या आवडीनिवडी पाहून हा ग्रंथ तयार केला आहे व कांहीं व्यक्तींच्या आवडी साफ भिन्न असतीलहि विशेषतः हल्लीच्या तथाकथित सुशिक्षितांच्या समजुतीप्रमाणें हा ग्रंथ नाहीं ही गोष्ट निवेदनांत स्पष्ट केली आहे. डॉ. नियोगी यांनीं म्हटल्याप्रमाणें हा ग्रंथ मराठी भाषेचे अभ्यासक व सामान्य वाचक यांच्यासाठीं आहे. छोट्या कालखंडांत वावरूं पहाणाऱ्या आधुनिक विद्वानांनीं निराळा संग्रह करावा हेंच ठीक.

समीक्षकांनीं कुसुमाग्रजांच्या 'पृथ्वीचें प्रेमगीत' इत्यादि कविता नसल्याबद्दल तक्रार केली आहे. स्वतः कुसुमाग्रज काय म्हणतात पहा. त्यांच्या कुठल्या कविता घेतल्या व त्या कशा निवडल्या हें त्यांना कळवल्यावर 'कवितांची निवड आपण ज्या पद्धतीनें करीत आहात ती अभिनव व अभिनंदनीय आहे', असें त्यांनीं लिहिलें. पुस्तक पूर्ण झाल्यावर 'आपण एक फार मोठें व महत्त्वाचें कार्य उत्तम प्रकारें तडीस नेलें' असें त्यांनीं संपादकांना कळविलें. यावर समीक्षकमहाशयांचें काय म्हणणें आहे ? भीमक बाळा हीहि गडकऱ्यांची आवडती एक प्रसादमुक्त कविता. आपस्त्यांची 'समरमहिमा' ही समीक्षकांच्या जन्मापूर्वी विख्यात असलेली कविता. या कविता विसरूं नये म्हणून संपादकांना अनेक पत्रें आलीं. नेमक्या त्याच कविता समीक्षकांना त्याज्य वाटतात ! पण संपादकीय निवेदनांत या सुशिक्षितांच्या उलट्या दृष्टीचें वर्णन केलें आहे. तेव्हां जास्त सांगणें नकोच.

समीक्षक ज्ञानेश्वर व तुकाराम सोडून ईतर प्राचीन कवींच्या वाटेसच गेले नाहीत. हें सावधगिरीमुळें कीं काय ? ज्ञानेश्वरीबद्दल त्यांनीं एवढें लिहिल्यावर त्या भागांतली एक चूक ते दाखवतील असें मला वाटलें, पण फुकट. उघड असलेले मुद्रणदोष मात्र ते दाखवतात. हे मुद्रणदोष कां आले तें जरा स्पष्ट सांगतों. संपादकांचा व्यवसाय हिशोब खात्याचा तेथें दिवसभर काम करून अनेक अडचणी सोसून त्यांनीं हा उद्योग केला. पण शेवटीं आयत्यावेळीं कुणीतरी त्यांची मुंबईबाहेर रवानगी केली. त्यामुळें प्रूफ तपासणें दुसऱ्यावर सोपवावें लागलें. त्याचा परिणाम मुद्रणदोष.

प्रस्तुत समीक्षण वाचून ग्रंथांत काय आहे तें कळत नाहीं. ग्रंथाला कविपरिचय आहे हेंहि कळत नाहीं. या ग्रंथानें काय साधलें असें समीक्षकांना वाटतें. त्यांनीं त्यांच्याच शिक्षणखात्याचे सर्वोच्च अधिकारी व सचिव श्री. चिन्मुळगुंद I. C. S. यांचा या ग्रंथावरील अभिप्राय वाचून पहावा. (साहित्यसहकार मे १९५९). ते म्हणतात : 'तुमचा ग्रंथ म्हणजे मराठी काव्याचा इतिहासच आहे. एकाकाळीं प्रख्यात असलेल्या कविता परत लोकांच्यासमोर आणल्याबद्दल त्यांनीं समाधान व्यक्त केलें आहे. संतकवींचे उत्कृष्ट उतारे आल्याबद्दलहि त्यांना बरें वाटलें. श्री. चिन्मुळगुंदांचें म्हणणें बरोबर कां समीक्षकांचें म्हणणें बरोबर तें वाचकांनींच ठरवावें.

मात्र 'नवें नवनीत' अनेकांना खटकतें. कांहींना आपल्या प्रतिष्ठेवर किंवा मिरासदारीवर गदा आली असें वाटतें. साहित्य ॲकॅडमीनें या ग्रंथाची एकहि

प्रत विकत घेण्याचें नाकारलें पण एक प्रत मात्र युक्तीनें फुकट उपटली. नभोवाणीचे मंत्री या ग्रंथाची स्तुती करतात, पण नभोवाणी या ग्रंथाचें नांव घेणार नाहीं. शिक्षण खात्याच्या सचिवांना आवडलेलें पुस्तक पण त्याला बक्षिस मिळणें अशक्य. या सर्व प्रकारांचें एक कारण पंडित राहुल सांकृत्यायनांच्या शब्दांत पहा. ते म्हणतात : 'आपका ग्रंथ सुंदर और विवेकपूर्ण जान पडा. आधुनिक लेखकोमेसें कुछके रुष्ट होनेकी पर्वा नहि करनी चाहिये' पंडितांनीं म्हटल्याप्रमाणें आधुनिक लेखक रुष्ट आहेत हिंदु देवतांचें भरपूर विडंबन करणारा लेख लिहिणाऱ्या एका लेखकांनीं 'जुनें नवनीत' व 'नवें नवनीत' दोन्ही बुरसटलेलीं असल्याचें जाहीर केलें आहे. नव्या नवनीतासारखे ग्रंथ छापण्यास आधीं प्रकाशक तयार नसतात, व पदरचे पैसे खर्च करणारा कोणी खुळा निघाला तर त्याला नानातऱ्हेंनी फसवण्यास प्रकाशक–मुद्रक इत्यादि अनेक मंडळी तयार. वर आधुनिक टीकाकार आहेतच. या प्रकारांत कुठल्या तऱ्हेचें वाङ्मय निर्माण होणार ?

शेवटीं मला एक विशेष वाईट वाटणारी गोष्ट सांगतो. ती म्हणजे कुसुमाग्रजांच्या 'अनामिकास' या कवितेनें जागा अडवली हें विधान. स्वातंत्र्याप्रीत्यर्थ बलिदान केलेल्या अनामिक वीरांच्यावर एका श्रेष्ठ कवीनें केलेली ही प्रसादपूर्ण कविता. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर १२।१३ वर्षांत या कविता त्याज्य म्हटल्या जाव्या व स्त्रियांच्या वस्त्रहरणाच्या प्रसंगांचीं वर्णनें पाहिजेत असें आधुनिक लेखकांनीं उघडपणें भारदस्त मासिकांतून लिहावें ही दैवगती आहे.

– एक वाचक

---

## समीक्षकाचें उत्तर —

मीं लिहिलेल्या परीक्षणावर टीका करणारा वरील लेख कोणी लिहिला असेल तें असो, परंतु तो अशा चाणाक्षपणानें लिहिला आहे कीं लेखक हा 'नवें नवनीत' या संग्रहाचे संपादक श्री. ज. शा. देशपांडे यांच्याशीं एकरूप होऊन लिहीत आहे असा भास निर्माण व्हावा परंतु सदर लेखकानें वरील लेखांत कांहीं पुरावे अशा कौशल्यानें पुढें केले आहेत कीं 'नवें नवनीत' या संग्रहाचें उणेपण वाढत्या श्रेणीनें मनावर ठसत जावें व पांचामुखीं परमेश्वर या न्यायानें त्यावर शिक्कामोर्तब व्हावें. संग्रहाची बाजू उचलून धरतां धरतां ह्याचा उणेपणा दर्शविणारे पुरावे दिले गेले ते खालीलप्रमाणें :—

(१) "मात्र नवें नवनीत अनेकांना खटकतें."

(२) "साहित्य ॲकॅडमीनें या ग्रंथाची एकहि प्रत विकत घेण्याचें नाकारलें —"

(३) "नभोवाणी या ग्रंथाचें नांव घेणार नाहीं."

(४) "त्याला बक्षीस मिळणें अशक्य."

(५) 'आधुनिक लेखक रुष्ट आहेत'

(६) "एका लेखकांनीं जुनें नवनीत व नवें नवनीत दोन्ही बुरसटलेलीं असल्याचें जाहीर केलें."

(७) "पुष्कळ समीक्षकांनीं पोपटासारखी विनोबाजींच्या कांही वाक्यांची री ओढली. (विनोबाजींनीं प्रस्तावनेंत ग्रंथांतील अनेक उणीवा दाखविल्या आहेत)."

जणू कांही एवढ्यानें उणीवा दर्शवून समाधान झालें नाहीं म्हणून श्री. देशपांडे यानीं तरुणवयांत 'नवें नवनीत' सारखाच एक संग्रह केला होता त्याचा इतिहास प्रतिटीकेंत दिला असून " पण त्या संग्रहावर अनेक जाणत्या लोकांनीं कोरडे ओढले, कांहींनीं तर तो संग्रह गटारांत फेकून द्यावा असें सुचविलें " असे त्यावरचे अभिप्रायहि नमूद करून श्री. देशपांडे यांच्या संग्रहांवर पूर्वीपासून कोठल्या प्रकारच्या प्रतिक्रिया झाल्या आहेत हें साद्यंत सांगितलें आहे. आणि ज्या अर्थीं 'नवें नवनीत'च्या संपादकाशीं वैर नसतां दिल्लीपासून मुंबईपर्यंतच्या विविध संस्था व व्यक्तींच्या अशा प्रतिक्रिया झाल्या आहेत त्याअर्थीं 'नवें नवनीत' संग्रह कसा असावा या विषयीं आपलें मत बनविण्याचें सूचकतेनें वाचकांवरच सोपवलें आहे. या शिवाय या लेखकानें अशीं कांहीं वाक्यें लिहिलीं आहेत कीं तीं वाचतांना हसूं यावें. या संग्रहांत चक्रधरस्वामींची

कविता नाहीं अशी दुसऱ्या वृत्तपत्रांत कोणीं टीका केली होती. त्या टीकाकारास उद्देशून लिहिलें आहे कीं, " बिचाऱ्या समीक्षक महाशयांना चक्रधरस्वामी स्वतः कवि नव्हते हें ठाऊकच नव्हतें "— या बाबतींत संशोधक लोक असें सांगतात कीं चक्रधर स्वामींनीं कांहीं चौपद्या व पदें रचलीं असावींत हा तर्क वाजवी आहे असें लीळाचरित्र वाचल्यावर वाटूं लागतें. अर्थात् त्या गीतांचें संशोधन करून तीं संगृहीत करण्याची जबाबदारी वरील वृत्तपत्रांतील टीकाकारानें श्री. देशपांडे यांच्यावर टाकली हें खरें परंतु यामुळें चक्रधरस्वामी कवि नव्हते हें कसें सिद्ध होईल ?— कालमर्यादेंत येणाऱ्या अनेक नामवंतांच्या कविता कां घेतल्या नाहींत या आक्षेपाला लेखकानें मोठें गमतीदार उत्तर दिलें आहे. लेखक म्हणतात," बाकीच्यांचा ७०० पृष्ठांत समावेश कुठून होणार ? " आतां सातशें हा आंकडा लेखकानेंच दिला आहे म्हणून बरें! रामदासांना तिसांच्यावर पानें द्यायची, माधव कवींना तेरा पानें द्यायचीं, श्रीनिवास बोबडे व राजवाडे यांच्या पांच पांच कविता घ्यायच्या तर यशवंत माधव ज्यूलिअनांची एकेकच कविता घ्यायची, आखून घेतलेल्या कालमर्यादेबाहेरच्या कवीची कविता घ्यायची व कालमर्यादेंत येणाऱ्या तांबे–गिरीश, बोरकर, मर्ढेकर अशा अनेक नामवंताच्या कविता गाळायच्या ! मी अशा एकोणीस कवींची यादी दिली होती अशी बेप्रमाण व तत्त्वशून्य वाटणी करून पृष्ठमर्यादेची अडचण सांगायची ती सातशें पानांची ! सातशें पानें हा उच्चार कितीहि हलक्या आवाजांत केला तरी त्यांतून उजळणीच्या पुस्तकाच्या जाडीचा बोध होणार नाहीं. परंतु अशा पद्धतीनें सदर लेखकानें लिहिल्यामुळें ' नवें नवनीत ' या संग्रहाची बाजू मांडण्यापेक्षां उणीवा दर्शविण्याचेंच ठरविलें आहे हा ग्रह पक्का होतो. या लेखकांनीं आणखी एक वाक्य लिहिलें आहे कीं तें वाचून हंसू आल्यास माझा दोष नाहीं लेखक लिहितात, "स्त्रियांच्या वस्त्रहरणाच्या प्रसंगाचीं वर्णनें पाहिजेत असें आधुनिक लेखकांनीं उघडपणें भारदस्त मासिकांतून लिहावें ही दैवगती आहे." असें कांहीं मी लिहिल्यामुळें वाचकांना माझा राग येईल व कोणत्या स्त्रीच्या वस्त्रहरणाच्या प्रसंगाचा हट्ट धरून मी अनीतीनें लिहीत आहे असा प्रश्न त्यांच्या संतप्त मनांत निर्माण होईल. वाचकांची उत्कंठा अधिक ताणण्याची इच्छा नाहीं. महाभारतांतला अत्यंत कारुण्यपूर्ण, हृदय पिळवटून टाकणारा व रोमहर्षक प्रसंग म्हणजे द्रौपदी वस्त्रहरणाचा प्रसंग. जो प्रसंग साऱ्या महाभारताचा गाभा आहे. ज्या प्रसंगानें महाभारतीय घनघोर संग्रामाला प्रेरणा दिली.

मानवी जीवनांतील विलक्षण संघर्षाचें मूर्तिमंत दर्शन घडविणारा व काव्यसौंदर्याचें स्वगृह असणारा तो प्रसंग गाळून फक्त फेडल्या गेलेल्या लुगड्यांचीं वर्णनें दिलीं म्हणून मीं दोष दिला होता त्याला उद्देशून वरील भाष्य आहे. द्रौपदीवस्त्रहरणाच्या प्रसंगाकडे तमासगिराच्या नजरेनें बघणारा कोणी भारतीय असेल यावर विश्वास बसत नाहीं. आणि तशी लज्जा वाटून तो उतारा गाळला गेला असेल तर यासारखें विकृत कांहीं नाहीं. संपादकांना सावरून धरण्याचें निमित्त करून त्यांना अत्यंत अवघड जागीं आणून सोडण्याचा चाणाक्षपणा वरील लेखकानें येथें दाखवला आहे यांत शंका नाहीं. यानंतर, ज्ञानेश्वरीच्या उताऱ्यांत ळ व ल च्या लकबा असलेले उतारे आहेत, त्यांत एक धोरण नाहीं; जीवनलहरीचा प्रकाशनसन १८४८ दिला आहे, श्रीकृष्ण पोवळे यांच्या नांवावर ' सुगंधमाती ' नांवाचा संग्रह दिला आहे तो जळमाती असावा असे कांही दोष मी दाखविले होते. हे सारे मुद्रणदोष आहेत असें लेखक म्हणतो. प्रश्न असा कीं, मुद्रण दोष व ते आपणांस (आपणांस म्हणजे संपादकास !) माहीत आहेत तर मग शुद्धिपत्रांत ते कां दिले नाहींत ? याला काय उत्तर मिळेल याची कल्पना नाहीं. परंतु या संदर्भांत आणखी एक मजेशीर वाक्य लेखकानें लिहिलें आहे तें असें " ज्ञानेश्वरीबद्दल त्यांनीं एवढें लिहिल्यावर त्या भागांतली एक चूक ते दाखवितील असें मला वाटलें, पण फुकट. " म्हणजे मला माहीत नसलेली आणखी एक चूक त्यांत आहेच हें गुपित उघड करून मूळ संपादकाला अधिक गोत्यांत आणायचें हाच ना मतलब ? असो ! मी संपादकानें ग्रंथाच्या प्रस्तावनेंत सांगितलेले उद्देश ध्यानांत घेतले नाहींत असें सांगून सदर लेखकानें ग्रंथांतील एका मोठ्या कच्च्या दुव्याकडे वाचकांचें लक्ष वेधून घेतलें आहे. या प्रस्तावनेंत संपादकांनीं काव्याची व्याख्या करण्याचे व काव्याचें स्वरूप सांगण्याचे जे न पेलणारे प्रयत्न केले आहेत त्याची हजेरी वाङ्मयाचा नवखा विद्यार्थीहि घेईल असे








ते आहेत. अशी काव्यदृष्टि ठेवून ग्रंथाचे उद्देश व स्वरूप ठरविण्यांत चुका झाल्या तर त्यांत नवल नाहीं.

शिवाय अनेक कवींच्या मी वाटेसहि गेलों नाहीं अशी एक तक्रार नमूद आहे. सातशे पानांच्या प्रचंड व्यापांत संपादकांना श्रेष्ठ कवींच्या कविताहि समाविष्ट करणें जेथें अवघड जातें तेथें चार पानांच्या अक्षरशः चार पानांच्या परीक्षणांत सर्वांचा परामर्श घेणें किती अशक्य आहे हें ध्यानांत घ्यावें. तथापि तो तो कालखंड व त्यांतील प्रमुख कवि यांच्या काव्याचा परामर्श मीं घेतलेला आहे परंतु वरील लेखकानें उपस्थित केलेल्या एकाहि मुद्याला समाधानकारक उत्तर दिलें नाहीं. तसा त्यांचा हेतुच दिसत नाहीं हें वरील चाणाक्ष विवेचनावरून दिसेल.

**माझे आक्षेप खालील प्रमाणें होते.**

( १ ) परशुरामतात्यांचें नवनीत, जोग कुसुमाग्रजांच्या काव्यवाहिनी व मुं. म. सा. संघाचा मराठी १९२०–५० हे संग्रह म्हणजेच प्राचीनापासून अद्ययावत् कवितांचे संग्रह असतांना हा संग्रह काढण्यांत विशेष काय साधलें ?

(२) संकलनकारांच्या दृष्टींत वाङ्मयइतिहासकाराची दृष्टि व वाङ्मयसौंदर्यशोधकाची दृष्टि यांचा समन्वय व्हावयास हवा. विशिष्ट कालखंडांतील वाङ्मयाच्या आशयाचें स्वरूप, त्याची निर्माण झालेली परंपरा, वाङ्मयरचनेचा निर्माण झालेला विशिष्ट आकार यांची सलगता संकलनांत दिसावयास हवीच परंतु त्याचबरोबर कवीचें स्वतःचें जें बलस्थान असतें तेंहि त्याचवेळीं संकलनांत यावयास हवें. याच कारणानें वैयक्तिक आवडीनिवडीला संकलनांत मर्यादा पडत असतात. या दृष्टीनें पाहिलें तर ‘ नवें नवनीत ’ हें संकलन सदोष कांहीं विभागांच्या बाबतींत वाङ्मयदृष्टीनें व वाङ्मय प्रकारांच्या दृष्टीनें सदोष व अत्यंत निराशाजनक आहे.

(३) ठळक कवींचा विचार करतां ज्ञानेश्वरी व तुकाराम गाथा यांच्यांतील उताऱ्यांची निवड समाधानकारक नाहीं. जें अगत्य गीतातत्त्व सांगण्यासाठीं ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी लिहिली तें तत्त्वज्ञान ज्ञानदेव सांगूं लागतात तेथेंच संपादकांनीं तें छाटलें. अशीं सुमारें सात उताऱ्यांचीं उदाहरणें देतां येतात. मराठीची स्तुति व श्रोत्यांशीं सलगी करणारे उतारे म्हणजे ज्ञानेश्वरीचें मर्म नव्हे.

(४) तुकारामांच्या अभंगांत एक तात्त्विक संगति सांपडते. तसेंच त्यांच्या आध्यात्मिक जीवनाचा विकास ह्यांत आढळतो. हीं दोन्हीं वैशिष्ट्यें तुकारामांना बावीस पानें देऊन वगळलीं गेलीं. काव्यदृष्ट्या उत्तम ठरणारे अनेक अभंग न घेतां उपदेशपर अभंगावर भर दिला गेला.

(५) कथाकाव्याचें वैभव जेथें प्रकट होतें तेच प्रसंग आधींमधीं तोडून दिले गेले. पंडितकाव्यांत निसर्गवर्णन, नगर-नगरवासी वर्णन, व्यक्तिवर्णन, कथारंभ व ग्रंथसमाप्ति हेच उतारे आधिक्यानें घेतले गेले.

(६) शाहीरी काव्याची निवड प्रातिनिधिक नाहीं. शाहिरीशृंगारपर लावण्या वगळण्याचें कारण नव्हतें.

(७) आधुनिक कवींच्या काव्याची निवड अत्यंत निराशाजनक आहे. केशवसुतांच्या झपूर्झा, हरपलें श्रेय; बींच्या चांफा, वेडगाणें; चंद्रशेखरांच्या गोदागौरव, गंगाधारीं भजन व कुसुमाग्रजांच्या पृथ्वीचें प्रेमगीत, अहिनकुल स्वप्नाची समाप्ति अशा कविता वगळल्या जाव्यात हें खेदजनक आहे.

(८) कोणाच्या किती कविता घ्याव्यात याचें तारतम्य ठेवलें नाहीं. माधव कवींना तेरा पानें तर यशवंत, माधव ज्यूलिअनांची एकेक कविता तर राजा बढे – श्रीनिवास बोबडे यांच्या पांच पांच कविता घेतल्या.

( ९ ) १९४७ ची कालमर्यादा आखून घेऊन १९५० नंतर लिहिलेली कविता घेतली तर या कालखंडांत येणाऱ्या तांबे, काव्यविहारी, कुंजविहारी, गिरीश, काणेकर, बोरकर, मर्ढेकर, पु. शि. रेगे, इंदिरा अशांच्या कविता घेतल्या नाहींत.

( १० ) जीवनलहरीचा प्रकाशन सन १८४८ दिला. पोवळ्यांच्या नांवावर जळमाती ऐवजीं ‘ सुगंधमाती ’ हा संग्रह छापला. हे मुद्रण दोष कसे होऊं शकतात ?

– वरील आक्षेपांना वरील लेखकांनीं उत्तरें दिलीं नाहीत हें ताडून पाहतां येईल. अधिक काय लिहावें ?

— शंकर वि. वैद्य








**चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान**

**श्री. वि. ह. निजसुरे यांच्या ' चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान ' ह्या पुस्तकाच्या समालोचना-संबंधी :**

संपादक नवभारत यांस,

श्री. निजसुरे यांच्या समालोचनावर मी खालीं चार शब्द लिहीत आहे. कृपया प्रसिद्धी द्यावी.

( १ ) श्री. निजसुरे यांनी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या संबंधी जें लिहिलें आहे त्याला उत्तर द्यायला किंवा उत्तर न देण्याचा निर्णय घ्यायला तर्कतीर्थ समर्थ आहेत. म्हणून त्यासंबंधीं मी कांहींहि लिहीत नाहीं.

( २ ) श्री. निजसुरे म्हणतात कीं पुराणें भाकडकथा सांगतात असें एक भरमसाट विधान मी केलें आहे. " पुराणकारांनीं भाकडकथा सांगितल्या " असें मी म्हटलें आहे हें खरें. पण भाकडकथाच फक्त सांगितल्या असें मी म्हटलेलें नाहीं. पुराणांची वाङ्मय म्हणून आणि इतिहास म्हणून योग्य ती किंमत मी जाणतों. परंतु भाकडकथांचा डोंगरहि मी जवळून पाहिला असल्यामुळें माझें विधान शिल्लक राहतेंच. श्री. निजसुरे पुराणांतल्या सगळ्या अचाट गोष्टी खऱ्या मानतात कीं काय ? मानीत असतील तर मला वाद करायचा नाहीं.

( ३ ) चार्वाकांनी प्रत्यक्ष आणि प्रत्यक्षनिष्ठ अनुमान एवढींच प्रमाणें आम्ही मानूं असें सांगितलें. प्रत्यक्ष प्रमाणाचे निर्माते आम्ही असें कधींहि सांगितलें नाहीं. चार्वाकवादाचा इतिहास सांगतांना प्रत्यक्ष प्रमाणाचा चार्वाकांनी " शोध " लावला असें मीहि कुठें म्हटलेलें नाहीं.

( ४ ) ज्यांत दुःखें आहेत, पण म्हणून जीवित दुःखमय आहे हें खरें नाहीं. सुखें आहेत; तीं भोगायचीं असतात. तूस टाकून दाणे घ्यावे तसें दुःख टाकून सुख घ्यावें असा चार्वाकांचा साधा सरळ सुखवाद आहे. श्री. निजसुरे यांना ह्याला निर्भेळ सुखवाद म्हणायचें नसलें तर माझा आग्रह नाहीं. सुखांत दुःखाची भेसळ असते. आपण घाण काढून टाकून स्वच्छ माल वापरावा. तें कसें ? ती एक कला आहे. इथें विस्तारानें स्पष्टीकरण करणें शक्य नाहीं.

( ५ ) लोकसिद्ध राजा हाच परमेश्वर हा चार्वाकांचा सिद्धांत श्री. निजसुरे समजतात तसा वेडगळपणाचा नाहीं. संघटित राज्यसंस्थेच्या आवश्यकतेची ती एक स्पष्ट जाणीव आहे. (चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान पृ. ९५ पहा)

( ६ ) चार्वाक धर्माधर्म नाहीं असे म्हणत तें ईश्वर, स्वर्ग, नरक, कर्मकाण्ड ह्यांच्या संदर्भांत. समाजधर्म, माणुसकीचा धर्म ' धारणात् धर्म ' चार्वाकहि जाणीत हें मी पुस्तकाच्या आठव्या प्रकरणांत विस्तारानें लिहिलें आहे.

( ७ ) " परलोकाकडे लक्ष असलेल्या कर्मकाण्डांत दुःख कोठें आहे ? " ह्या मथळ्याखालीं श्री. निजसुरे यांनीं पाश्चात्त्यांच्या आणि आमच्या जीवनदृष्टीविषयीं जें लिहिलें आहे तें नीटसें उलगडत नाहीं. त्यानीं दिलीं आहेत त्याच्या उलट उदाहरणें किती तरी देतां येतील. उदाहरणार्थ : पाश्चात्त्य पद्धतीच्या केशकर्तनालयांत मऊ मऊ गादीवर बसून मऊ मऊ गादीला पाठ टेकून आरामांत केंस कापवून घेणें कोणीकडे आणि भारतीय पद्धतीप्रमाणें पाठीचा कणा वाकवून मान न्हाव्याच्या गुडघ्यावर टेकून डोकें रक्तबंबाळ करून घेणें कोणीकडे ?

( ८ ) " प्रत्यक्षप्रमाणवाद्यांना ढोंग करण्याची जरूर नाहीं कारण ती सोय अतींद्रियवादी धर्मांत आहे. " हें वाक्य मी अगदी गैर लिहिलें आहे असें श्री. निजसुरे यांचें म्हणणें. यांत मी गैर काय लिहिलें ?

श्री. निजसुरे पुढें विचारतात, " म्हणजे चार्वाकांनीं ढोंगासाठीं बुद्धिवाद सोडून अतींद्रियधर्मांत जावें असा अर्थ समजावयाचा काय ? " असा अर्थ श्री. निजसुरे ह्यांना सुचतो तरी कसा ? चार्वाक ढोंगी असते तर त्यांनीं तसें केलें असतें; ते ढोंगी नव्हते म्हणूनच बुद्धिवादाला चिकटून राहिले असा ह्याचा सरळ अर्थ आहे; तोहि मीच सांगावयास पाहिजे कीं काय ?

( ९ ) चार्वाकांचे ग्रंथ दुष्टबुद्धीनें बुडविण्यांत आले असा सिद्धांत मी मांडलेला नाहीं; तसें तर झालें नसेल ना ? अशी शंका फक्त व्यक्त केली आहे.

( १० ) मिलनें स्वतःचा पराभव कबूल केला, ख्रिस्ताला दैवी अवतार मानलें, जोड नांवाचा नास्तिक पुढें आस्तिक झाला वगैरे ज्या गोष्टी श्री. निजसुरे यांनीं सांगितल्या आहेत त्यांची जबाबदारी माझ्यावर

किंवा प्राचीन चार्वाकांवर नसल्यामुळें त्याविषयीं कांहीहि लिहीत नाहीं.

( ११ ) माझ्या पुस्तकांत पृ. ४२-३ येथें व इतर अनेक ठिकाणीं मी प्राचीन भारतांतील सर्वच दार्शनिकांविषयीं पुरेशा आदरानें लिहिलें आहे; तरीहि श्री. निजसुरे म्हणतात कीं माझ्या पुस्तकांत इतरांविषयीं सहानुभूतीचा किंवा आदरमूलक विवेचनाचा मागमूसहि नाहीं ! माझें पुस्तक श्री. निजसुरे यांना संपूर्णपणें अमान्य असेल, पण त्याचें 'समालोचन' लिहायचें आहे तर तें काळजीपूर्वक वाचलें पाहिजे एवढें नम्रपणें सांगू इच्छितो.

— वाचकांस प्रार्थना अशी कीं त्यांनीं चार्वाकवादाविषयीं आपलें मत बनविण्यापूर्वीं 'समालोचना'बरोबरच माझें पुस्तकहि वाचावें. अधिक जिज्ञासू असतील त्यांनीं माझें पुस्तक नाहीं वाचलें तरी चालेल; पण चार्वाकदर्शनाचें मूळ साहित्य अवश्य अभ्यासावें.

— सदाशिव आठवले

---





अनुक्रमणिका






# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ६४–०–० |
| (२) धर्मकोश – उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १२६–०–० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५–०–० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०–०–० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ४ | | १३५–०–० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६–०–० |
| (७) हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) ... | | ५–०–० |
| (८) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६–०–० |
| (९) नवमानवतावाद ... ... ... ... | | २–८–० |
| (१०) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३–०–० |
| (११) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) ... | | ३–०–० |
| (१२) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... | | २–८–० |
| (१३) छत्रपति संभाजी महाराज ( श्री. वा. सी. बेंद्रे ) .... | | १६–०–० |